# दंतरोगांसंबंधी आयुर्वेदोक्त प्रतिबंधात्मक व चिकित्सात्मक उपायांचे विवेचनात्मक अध्ययन

---

**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयास**
**एम्.फिल्. (संस्कृत) पदवीकरिता सादर करण्यात आलेला**
**लघुशोधप्रबंध**

---


लघुशोधप्रबंधलेखिका
**डॉ. विजया किरण चावजी**
बी.डी.एस्., एम.ए. (संस्कृत-दर्शन)
एम.ए. (संस्कृत-साहित्य)

सहमार्गदर्शिका
**डॉ संयुक्ता अशोक गोखले**
एम.एफ.ए.एम.
एम.डी. (आयुर्वेद), पीएच.डी. (आयुर्वेद)
अधिष्ठाता, आयुर्वेद शाखा,
D.M.I.M.S. University
प्राचार्या, महात्मा गांधी आयुर्वेद कॉलेज,
सालोद (वर्धा)

मार्गदर्शिका
**प्रा. डॉ. सौ. नंदा पुरी**
एम.ए., बी.एड्. एम्.फिल्.
पीएच्.डी.(संस्कृत)
अधिष्ठाता व विभागप्रमुख
कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,
रामटेक



**संस्कृत विभाग**
**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक**

**सत्र २००६ - २००७**

# दन्तरोगांसंबंधी आयुर्वेदोक्त प्रतिबन्धात्मक व चिकित्सात्मक उपायांचे विवेचनात्मक अध्ययन

---

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयास
एम्.फिल्. (संस्कृत) पदवीकरिता सादर करण्यात आलेला

**लघुशोधप्रबंध**

---


लघुशोधप्रबंधलेखिका

**डॉ. विजया किरण चावजी**

बी.डी.एस्., एम.ए. (संस्कृत-दर्शन)
एम.ए. (संस्कृत-साहित्य)

सहमार्गदर्शिका

**डॉ संयुक्ता अशोक गोखले**

एम.ए.फ.ए.एम.
एम.डी. (आयुर्वेद), पीएच.डी. (आयुर्वेद)
अधिष्ठाता, आयुर्वेद शाखा,
D.M.I.M.S. University
प्राचार्या, महात्मा गांधी आयुर्वेद कॉलेज,
सालोद (वर्धा)

मार्गदर्शिका

**प्रा. डॉ. सौ. नंदा पुरी**

एम.ए., बी.एड. एम्.फिल्.
पीएच्.डी.(संस्कृत)
अधिष्ठाता व विभागप्रमुख
कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,
रामटेक

**संस्कृत विभाग**

**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक**



सत्र २००६ - २००७

# मार्गदर्शकाचे प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येत आहे की, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाच्या संस्कृत तत्त्वज्ञान पारंगत (एम्.फिल्.) पदवीसाठी लघुशोधप्रबंध विद्यापीठाला सादर करायचा असून त्यानुसार **डॉ. विजया किरण चावजी** यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक अभ्यास करून **'दंतरोगांसंबंधी आयुर्वेदोक्त प्रतिबंधात्मक व चिकित्सात्मक उपायांचे विवेचनात्मक अध्ययन'** हा लघुशोधप्रबंध माझ्या मार्गदर्शनाखाली विश्वविद्यालयाला सादर करण्यास लिहिला आहे.

हा लघुशोधप्रबंध एम्. फिल्. परीक्षेसाठी नेमण्यात आलेल्या अभ्यासक्रमाच्या योग्यतेचा आहे असे माझे मत आहे. म्हणून हा लघुशोधप्रबंध कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयास तत्त्वज्ञान पारंगत पदवीसाठी सादर करण्याची शिफारस करते.

नागपूर

दिनांक :

सहमार्गदर्शिका

**डॉ. संयुक्ता गोखले**
अधिष्ठाता आयुर्वेद शाखा,
D.M.I.M.S. University
प्राचार्या,
महात्मा गांधी आयुर्वेद कॉलेज,
सालोद, वर्धा

मार्गदर्शिका

**प्रा.डॉ.सौ.नंदा पुरी**
अधिष्ठाता व विभागप्रमुख
कविकुलगुरु कालिदास
संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक

# प्रतिज्ञापत्र

मी प्रतिज्ञापूर्वक जाहीर करते की, प्रा. डॉ. सौ. नंदा पुरी व डॉ. संयुक्ता गोखले यांच्या मार्गदर्शनाखाली लिहिलेला **'दंतरोगांसंबंधी आयुर्वेदोक्त प्रतिबंधात्मक व चिकित्सात्मक उपायांचे विवेचनात्मक अध्ययन'** हा लघुशोधप्रबंध तत्त्वज्ञान पारंगत (एम्.फिल्.) पदवीसाठी कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालयास सादर करीत आहे., मी हा लघुशोधप्रबंध यापूर्वी कोणत्याही विद्यापीठास कोणत्याही परीक्षेसाठी सादर केलेला नाही अथवा प्रकाशित देखील केला नाही.

नागपूर

दिनांक :

लघुशोधप्रबंध लेखिका

**डॉ. विजया किरण चावजी**

कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,

नागपूर

# ऋणनिर्देश

सदाशिवसमारम्भां शङ्कराचार्यमध्यमां ।
अस्मदाचार्यपर्यन्तां वन्दे गुरुपरम्पराम् ।।

माझ्या लघुशोध निबंधाच्या मार्गदर्शिका **डॉ. नंदा पुरी** व सहमार्गदर्शिका **डॉ. संयुक्ता गोखले** यांच्या सुयोग्य मार्गदर्शनाविषयीचे आभार मी शब्द व क्रिया या दोहोंनी मानू इच्छिते. प्रस्तुत लघुशोधनिबंधात शब्दाद्वारे व भविष्यकाळातील प्रकल्पामधील क्रियात्मक सहभागाने मी आपले आभार व्यक्त करू इच्छिते.

विषय सिद्ध करण्यासाठी ग्रंथालयाची मदत अनिवार्य आहे त्यासाठी कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, या संस्थेच्या ग्रंथालयाची विशेष मदत झालेली आहे. त्याकरिता या संस्थेमधील ग्रंथपाल यांनी केलेल्या साहाय्याबद्दल मी त्यांची आभारी आहे.

प्रस्तुत लघुशोधप्रबंधाच्या अक्षरजुळणीसाठी श्री. मोहन बापट आणि कु. वर्षा कौशल यांना मी हार्दिक धन्यवाद देते.

या लघुशोधप्रबंधास प्रत्यक्ष - अप्रत्यक्षरित्या सहकार्य करणाऱ्या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद.

वेदवृक्षाच्या अगणित शाखांमधील गुरुशिष्य पंरपरेला माझा हा लघुशोधनिबंध सादर समर्पित.

- डॉ. विजया किरण चावजी

# अनुक्रमणिका

# संक्षेपसूची

| | | |
|---|---|---|
| का. सं. | – | काश्यपसंहिता |
| च. सं. | – | चरकसंहिता |
| सु. सं. | – | सुश्रुतसंहिता |
| शा. सं. | – | शारङ्गधरसंहिता |
| भे. सं. | – | भेलसंहिता |
| हा. सं. | – | हारितसंहिता |
| भा. प्र. | – | भावप्रकाश |
| मा. नि. | – | माधव निदान |
| भै. र. | – | भैषज्य रत्नावली |
| सा. वा. | – | सार्थ वाग्भट |
| आ. स्व. | – | आयुर्वेदीय स्वस्थवृत्त |
| अ. सं. उ. | – | अष्टांग संग्रह उत्तर खंड |

# प्रस्तावना

ब्रह्यांडातील समस्त जीवांमध्ये मानव सर्वांपेक्षा वेगळा आहे व प्रगतीची अगणित शिखरे पादाक्रान्त करण्याची इच्छा व क्षमता दोन्ही मानवात स्थायी रूपात आहे. जिज्ञासायुक्त मन असल्यामुळे मानव कधीही संतुष्ट राहात नाही व विभिन्न क्षेत्रातील अधिकाधिक ज्ञान प्राप्त करण्याची आकांक्षा त्याला स्वस्थ बसू देत नाही.

प्रकृती इतकी विराट व विशाल आहे की, तिला शब्दांनी व्यक्त करता येत नाही. मानवाच्या जितक्या समस्या आहेत, जितके प्रश्न आहेत, त्या सर्वांची उत्तरे निसर्गाकडे आहेत. प्रकृतीच्या रहस्यांना जाणण्याच्या उत्कट महत्वाकांक्षेमुळे विज्ञानाचा जन्म झाला.

स्वाभाविक रूपाने हे विज्ञान जीवनाच्या विविध शाखांमध्ये विकसित झाले. या सर्व विकसित क्षेत्रांमधील 'शरीरविज्ञान' ही एक अत्यंत महत्त्वपूर्ण विज्ञानशाखा आहे. मानवासाठी सर्वप्रथम महत्त्वाचे आहे ते त्याचे शरीर.

शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्। (कुमारसंभव ५ वा सर्ग)

या शरीराला निरोगी ठेवण्याचा अखंड प्रयत्न व प्रयास मानव आदिकाळापासून करत आलेला आहे व निसर्गाकडून आपल्या व्याधींवर उपाय मिळवित आलेला आहे.

आपण जाणत असलेल्या विश्वामध्ये भिन्न क्षेत्रात स्वास्थ्यरक्षणहेतू अनेक चिकित्सा पद्धती अस्तित्वात आहेत. त्यापैकी एक पद्धत आहे 'आयुर्वेद-चिकित्सा-पद्धती'. भारतीय परंपरेत आयुर्वेद एका विज्ञानाच्या रूपात प्रतिष्ठित आहे व त्याची एक समृद्ध, सुदृढ परंपरा आहे. अश्विनीकुमार, चरक, सुश्रुत आदि आचार्यांची नावे भारतीय परंपरेच्या कोणत्याही अभ्यासकासाठी अपरिचित नाहीत.

स्वास्थ्य संबंधी प्राचीन ग्रंथ जी माहिती उपलब्ध करून देतात, ती आधुनिक चिकित्सा विशेषज्ञांकरिता अनेकदा आश्चर्याचा अनुभव देते. प्राचीन ग्रंथांमध्ये मानव शरीराला संपूर्णपणे स्वस्थ ठेवण्याविषयीची माहिती तर आहेच परंतु त्या व्यतिरिक्त शरीराच्या विभिन्न अंगांना स्वस्थ व गतिशील बनविण्यावर विशेष भर दिलेला दिसतो.

भारतीय परंपरेनुसार शरीराला सर्व धर्मांचे माध्यम मानले आहे. स्वस्थ शरीराशिवाय 'जीवेत् शरद: शतम्' ची कल्पना देखील केली जाऊ शकत नाही. आणि हे उचितच आहे, कारण जीवन व समाज ह्यांच्या विभिन्न आरोह-अवरोह यांची कल्पना शरीराच्या अभावी केली जाऊ शकत नाही. भारतीय मनीषींनी सोळा संस्कारांची परिकल्पना देखील मानवी शरीर व चेतना यांना अनन्ताच्या उंचीवर नेण्याच्या उद्देशानेच केली आहे. प्राचीन ग्रंथातच नाही तर प्रियदर्शी सम्राट अशोकाच्या अभिलेखांमध्ये देखील व्यापक स्तरावर चिकित्सालये व स्वस्थ जीवनाची चर्चा आहे. यावरुन हे स्पष्ट होते कीं, शरीर व त्याच्या विभिन्न अंगांची सुव्यवस्था व सुखद जीवनाची कामना विशेषज्ञांना निरंतर प्रभावी करीत राहिली आहे.

शरीराच्या स्वास्थ्यरक्षणामध्ये प्रत्येक अंग समानतेने महत्त्वपूर्ण आहे. त्यामधील एक क्षेत्र पचनाचे आहे. अन्नग्रहण, अन्नपचन व मलउत्सर्जन या तिनही क्रिया पचनसंस्थेच्या अंतर्गत येतात. दांत हे या पचनसंस्थेचे एक अविभाज्य अंग आहे व यांची सुरक्षा व सुदृढता यावर जीवन बऱ्याच अंशी अवलंबून असते.

दन्तशल्यचिकित्साशास्त्राचे अध्ययन करून अनेक वर्षांपासून याच व्यवसायात कार्यरत असल्याने समाजामधील दन्तरोग, मुखरोग व त्या अनुषंगाने इतर शारीरिक व मानसिक तक्रारी व त्यावरील उपाययोजना यांचा अभ्यास केलेला आहे.

कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयात संस्कृत भाषेचा अभ्यास करीत असताना अवांतर वाचनाच्या दृष्टिने काही आयुर्वेदिय ग्रंथ अभ्यासिले गेले. त्यामधील दन्तसंबंधी विवेचन वाचल्यावर प्राचीन चिकित्साशास्त्र व आधुनिक दन्तशल्यचिकित्साशास्त्र यांच्या समन्वयाने सामाजिक

दन्तआरोग्याची निगा राखण्याविषयी यशस्वी प्रयत्न करता येतील अशा विचाराने प्रस्तुत लघुशोधनिबंधाचे कार्य हाती घेतले आहे.

काश्यपसंहितेत 'आयुर्वेदमेवाग्रेऽसृजत्ततो विश्वानि भूतानि।' या वाक्याने आयुर्वेदाची प्राचीनता प्रकट केली आहे. आयुर्वेदाला सृष्टीच्या प्रारंभी उत्पन्न केले व त्यानंतर सर्व प्राण्यांना उत्पन्न केले असा अर्थ.

याच संहितेमध्ये 'आयुर्वेद' या शब्दाचा अर्थ करताना 'आयुर्जीवितमुच्यते विद्ज्ञाने धातुः, विद्लृलाभे च आयुरनेन जातेन विद्यते जायते विन्दते लभते न रिष्यतीत्यायुर्वेदः। असे सांगतात. अर्थ असा की, आयुचा अर्थ आहे जीवन. त्याबरोबर विद् ज्ञाने धातु किंवा विदलृ लाभे धातु जोडून 'आयुर्वेद' हा शब्द बनतो. अर्थात आयुर्वेदाद्वारे आयुचे ज्ञान व प्राप्ती होते.

या लघुशोधनिबंधात आयुर्वेदिय ग्रंथांमध्ये निर्देशित दातांचे दंतोद्भेद, दन्तविकार, उपाय, रोगप्रतिबंधक साधने यांचाच विचार केला जाईल. केवळ दन्तरोगांचा विचार केलेला असल्याने या शोधकार्यामध्ये इतर मुखरोगांचा समावेश केलेला नाही.

प्रस्तुत शोधनिबंधाकरिता विवेचनात्मक व विश्लेषणात्मक संशोधन पद्धती अवलंबिली आहे. प्रस्तुत संशोधन कार्यात प्राचीन व आधुनिक दंतशल्यचिकित्सा शास्त्राविषयीची तुलना नाही. निवडक जागी आधुनिक दंतचिकित्सा शास्त्रानुसार प्रचलित असलेल्या मतांचा सूचनात्मक अंतर्भाव केलेला आहे. आयुर्वेदीय बृहत्रयी (वाग्भट, सुश्रुत, चरक संहिता) व लघुत्रयी (शारङ्गधर संहिता, माधवनिदान, भावप्रकाश) या ग्रंथांचा आधार घेतलेला आहे. नंतरच्या काळातील काश्चप संहिता, भेलसंहिता व हारीतसंहिता यांचा देखील शोधकार्यात समावेश केलेला आहे.

प्रस्तुत शोधनिबंधात दंतरोग, निदान व प्रतिबंधात्मक उपाययोजनांविषयी चर्चा असल्याकारणाने मुखविवरासंबंधी माहिती असणे आवश्यक आहे.

औष्ठौ च दन्तमूलानि दन्ताः जिह्वा च तालु च ।
गलोऽगलादि सकलं मुखं इत्यभि यते ।।[३]

ओठ (ऊर्ध्व, अध), दन्तमूल, दन्त, जिह्वा, तालु, गळा, गाल आदि सर्व मिळून 'मुख' हा अवयव पूर्ण होतो.

मुखविवर हे साधारणपणे गुहेच्या आकाराचे असते. प्रवेशद्वाराचे कार्य ओष्ठद्वय (ऊर्ध्व, अध) करतात. बाजूला गाल, वरून तालु व खालून जिह्वा चिकटून असणारी मांसल बाजू यांनी मुखविवर पूर्णपणे गुहेसमान दिसते. या मुखविवराचे बाह्यसंपर्काचे कार्य ओष्ठद्वय विलग झाल्यावरच होते. मागील बाजूने मात्र मुखविवर ग्रसनिकेत (Pharynx) उघडते.

**ओष्ठ** – हे दोन असतात. ऊर्ध्व व अध. दोनही ओठ बाहेरून त्वचा व आतून श्लेष्मरक्षणकलेने (Mucous Membrane) आवृत्त असतात. दोनही ओठात मुखमुद्रणी पेशी, सिरा, धमनी व मेद (Oral muscles, nerves, blood vessels and fat) असतात. ओठ बंद केल्यावर मुखधारा समोरील दातांना (Incisors) समोर येते. दोन ओठांमधील संधीला 'सृक्कणी' (Angle of Mouth) म्हणतात. वरच्या ओठावर एक नतोदर खड्डा व त्याखाली एक उत्सेध असतो. प्रत्येक ओठ आतल्या बाजूला दन्तवेष्टनास जोडलेला असतो. त्याला 'ओष्टसीवनी' (अधरा व उत्तरा) म्हणतात.

**गाल** – चेहऱ्याच्या दोन्ही बाजूंचा बराच मोठा भाग गालांनी व्यापलेला असतो. हे गाल कपोलिका पेशींनी बनलेले असतात. आतील बाजूने श्लेष्मस्रावी कलेचे आवरण असते. वरील चर्वणक दातांच्या (Molar Teeth) बाजूला कर्णमूलिक लालास्रावी (Parotid Salivary Glands) ग्रंथींचे स्रोत दिसतात.

**दन्तवेष्ट** – हे दोन असतात व दन्तोदुखलमंडलाच्या दृढ स्नायूसूत्रांनी बनलेले असतात. आतून अस्थिधराकलेशी जोडलेले असतात व बाहेरून श्लेष्मस्रावी कलेने आच्छादित असतात. दन्तवेष्टनामुळे दांत दन्तदुखलात पक्के बसविलेले असतात.

**तालु** – मुखविवराच्या आतून वरच्या बाजूचे जे छत असते, त्याला 'तालु' असे म्हणतात. याचे दोन भाग असतात. पुढील भागात कठीण तालु असतो व मागील भागात कोमल तालु असतो. कठीण तालु हा भाग समोरून ऊर्ध्वहन्वस्थीच्या तालुफाकांनी व मागून कोमल तालुने बनलेला

असतो. हा भाग मुख व नासागुहा या अनुप्रस्थ अवस्थेत असतो. याच्या ऊर्ध्वभागामुळे नासागुहेचा अधस्तल तयार होतो. याच्या अधोभागामुळे मुखविवराचे छत तयार होते. याच्या मागील भागात श्लेष्मस्रावी ग्रंथी असतात. कोमळ तालु हा हलणारा पडदा असतो. हा पडदा कोमळ मांस व स्नायूतंतु यांनी बनलेला असतो. हा पडदा मुख व ग्रसनिका यांना वेगळे करतो. अन्न गिळतांना हा पडदा वर मागल्या बाजूस ओढल्या जातो. त्यामुळे ग्रसनिकेचे द्वार मोठे होते व अन्न नाकात जात नाही.

**जिह्वा** – जिह्वा मुखविवरात खालील बाजूस असते. तिचा समोरील भाग मुखाबाहेर येऊ शकतो. बाकीचा पूर्ण भाग मुखविवराच्या खालील भागास जोडलेला असतो. जिह्वेचा वरील भाग व किनारी कोठेही चिकटलेल्या नसतात. जिभेचा इतत्र न चिकटलेला भाग श्लेष्मस्रावीकलेने आच्छादित असतो. जिह्वेवर स्वाद वहन करणारे तीन प्रकारचे स्वादांकूर उपस्थित असतात. जेणेकरुन जिह्वेचे 'रसना' हे नांव सार्थ ठरते.या स्वादांकुरांद्वारे रसग्राहक कोषाणुमध्ये मधुर, आम्ल, लवण, कटु, कशाय व तिक्त या षड्रसांचे ग्रहण केले जाते.

दांत – दात दोन प्रकारचे असतात.

- अस्थायी दात (Temporary or milk teeth)
- स्थायी दात (Permanent teeth)

अस्थायी दात वयाच्या सहाव्या-सातव्या महिन्यात मुखात येऊ लागतात. साधारणपणे वयाच्या दुसऱ्या वर्षापर्यंत एकंदर २० दात (दहा ऊर्ध्वहन्वस्थीमध्ये व दहा अधोहन्वस्थीमध्ये) मुखविवरात येतात. हे अस्थायी दात असतात व वयाच्या सातव्या वर्षापासून पडू लागतात. त्यानंतर स्थायी दात जे एकंदर बत्तीस असतात ते येऊ लागतात. प्रत्येक दात तीन भागांनी बनलेला असतो.

- मूळ Root
- ग्रीवा Neck
- शिखर Crown

सर्व दातांमध्ये मध्यभागी दन्तमज्जा (Pulp) असते. या मज्जेभोवती पिवळट पांढरे आवरण असते. त्याला दन्तवस्तू (Dentine) म्हणतात. शिखरावरील दंतवस्तूवर एक जाड पांढरा थर असतो. त्याला दन्तकांचे (enamel) म्हणतात. मूल भागाची दंतवस्तू पातळ असते. त्याला वज्रलेप (Cementum) म्हणतात. मूलभागी दंतवस्तू व वज्रलेप यामध्ये अनेक छिद्रे असतात. त्यामधून धमनी, सिरा, नाड्या दन्तमज्जेत जातात. दन्तमूल हे ऊर्ध्व व अधोहन्वस्थीच्या खाचेमध्ये बसविलेले असतात. त्या ठिकाणी दात दन्तकलाधरेने (Periodontal tissue) बांधलेले असतात. ही कला मूलस्थानी वज्रलेपाला आच्छादून पुढे ग्रीवेला व दन्तवेष्टनाला आच्छादित करते.

दातांचा जो भाग ओठ किंवा गालाकडे असतो त्या 'ओष्ठपृष्ठ' व जो भाग जिव्हेकडे असतो त्याला 'रासनपृष्ठ' (Labial, buccal, lingual) म्हणतात. दातांच्या कर्तनकाजवळील पृष्ठाला 'सन्निकृष्ठ', तिसऱ्या पश्चिम दर्वणकाजवळील दाताला 'विप्रकृष्ठ' व मुख बंद असतांना दातांच्या एकमेकाजवळ येणाऱ्या पृष्ठांना 'घर्षणपृष्ठ' असे म्हणता.

दातांचे त्यांच्या चर्वणक्रियेतील सहभागानुसार विभाग होतात. दुध-दात (अस्थायी) एकंदर दहा ऊर्ध्व व दहा अध: हन्वस्थीत येतात.

| | | | |
|---|---|---|---|
| २ कर्तनक x २ | = | ४ | Incisors |
| १ रदनक x २ | = | २ | Canine |
| २ अग्रचर्वणक x २ | = | ४ | Deciduous Molars |

स्थायी दात एकंदर बत्तीस असतात. ऊर्ध्व हन्वस्थीत सोळा व अध: इन्वस्थीत सोळा.

| | | | |
|---|---|---|---|
| २ कर्तनक x २ | = | ४ | Incisors |
| १ रदनक x २ | = | २ | Canines |
| २ अग्रचर्वणक x २ | = | ४ | Premolars |
| ३ पश्चिमचर्वणक x २ | = | ६ | Molars |

कर्तनक या दातांचा घर्षणपृष्ठ तीक्ष्णधारायुक्त असतो. हे दांत एकमूलयुक्त असतात. रदनक दांत लांब टोकदार शिखराचे असतात. अग्रचर्वणक रदनकापेक्षा लहान व त्याच्या पार्श्वभागी असतात

व त्यांच्या घर्षणतलावर दोन उत्सेध असतात. पश्चिम चर्वणक सर्व दातांमधे मोठे, रुंद शिखराचे, चौकोनाकार असतात. घर्षणपृष्ठावर चार किंवा पाच ऊत्सेध असतात.

मानवी चेहऱ्याचे सौंदर्य खुलविणाऱ्या दातांचे चर्वण उच्चारस्पष्टता व एकंदर चेहऱ्याच्या मांसल भागाला आधार ही महत्त्वाची कार्ये आहेत. शरीरातील अन्नपचनाचे कार्य मुखविवरापासूनच सुरू होते. दातांचे मुखातील अस्तित्त्व, त्यांचे निरोगीत्त्व यांचा अन्नपचनावर निश्चितपणे परिणाम होतो. शरीरचिकित्साशास्त्रातील केवळ दंतविषयक शास्त्राचा भिन्न शाखेमध्ये विकास व विस्तार होणे यावरूनच दातांच्या महत्त्वाची कल्पना येते. प्राचीन काळात जरी दंतचिकित्सा ही वैद्यकशास्त्राची वेगळी शाखा नसली तरी आयुर्वेदिय ग्रंथांमध्ये या चिकित्सेतील उपलब्ध संदर्भ पाहता असे लक्षात येते की, प्राचीन आयुर्वेदाचार्यांना निरोगी दातांचे महत्त्व जाणवलेले होते व म्हणूनच त्यांनी त्यावर इतके संशोधन केले.

प्रस्तुत विषयास पूरक अशी आकृती परिशिष्ट क्रमांक १ मध्ये दर्शविली आहे.

*****

# प्रकरण १

# दंतवैद्यकशास्त्राचा इतिहास - भारतीय व इतर

# प्रकरण - १

# दंतवैद्यकशास्त्राचा इतिहास - भारतीय व इतर

''भूतकाळ हा वर्तमानकाळाचा आरसा होय'' असे जेव्हा म्हटले जाते, तेव्हा त्याचा अर्थ एवढाच असतो की भूतकाळाने घेतलेल्या नोंदी वर्तमानकाळात उपकारक ठरतात, त्यासोबत भविष्यकाळाकरिता उपयोगी सिद्ध होतात.

इतिहासाच्या कालगणनेनुसार ७व्या शताब्दीपर्यंतचा काळ प्राचीन, त्यानंतरचा १८व्या शताब्दीपर्यंतचा काळ मध्य व त्यानंतरचा सद्यकाळपर्यंतचा काळ आधुनिक मानल्या जातो.

## प्राचीन काळातील दंतसंबंधी माहिती -

मानवी शरीरात मुखरोगाची समस्या आदीकाळापासून आहे. २५००० वर्षापूर्वी अस्तित्त्वात असलेल्या क्रो - मॅगनॉन जमातीच्या लोकांच्या दांतांमध्ये कीडेचा पुरावा मिळालेला आहे. सर्वप्रथम नोंद असलेला दन्तरोग - 'दन्तकृमि (Tooth Worms)' या नावाने ५००० बी.सी. मधील सुमेरियन Text मधे मिळतो.

चीनमध्ये २७०० बी.सी. मध्ये अॅक्यूपंक्चरच्या शास्त्राने सडलेल्या दातामुळे होणारी वेदना थांबविल्याचा ऐतिहासिक पुरावा आहे.

इजिप्तच्या पॅपिरायमध्ये एबर्स पॅपेरस आहे. जे १७०० ते १५००बी.सी. मधील आहे. या पॅपिरायमध्ये ३७०० बी.सी. पर्यंतचे वैद्यकीय शास्त्राचे लिखित पुरावे सापडतात.

Aesculapius नामक ग्रीक वैद्य (१३०० - १२०० बी.सी.) किडलेले दात काढीत असे असा अंदाज केला जातो.

Cordova येथील Abulcasis (१०१३ ते ११०६) याची दातांवर केलेल्या शल्यचिकित्सांची पुस्तके आहेत.

Hippocrates (४६०-३७० बी.सी.) व Aristotle यांनी लेप व तप्त शलाका यांचा उपयोग दन्तरोगामध्ये केल्याचा दाखला आहे.

Celsus (१०० बी.सी.) नामक रोमन वैद्यकीय लेखकाने मुखरोग, रक्त वाहणाऱ्या हिरड्या व मुखातील व्रण याविषयीचे सविस्तर लेखन केलेले आहे.

मेसोपोटॅमियामध्ये दन्तचिकित्सेकरिता वनौषधींचा उपयोग केलेला आहे.

इजिप्शियन व बॅबिलोनियन संस्कृतीमध्ये दन्तदुखीचा संबंध दैवी कोपाशी जोडला जात होता. इजिप्तमध्ये २८०० बी.सी. मधील खालील जबडा (त्यामध्ये दोन छिद्रे केलेली) सापडला आहे. पर्शियन शल्य चिकित्सक Rhazes (८६० - ९३०) याने दातातील छिद्रे भरली असल्याचा लिखित पुरावा आहे.

प्राचीन युगातील दन्तशल्यचिकित्सा निश्चित करता येत नाही. कारण की ती चिकित्सा पूर्ण शरीराच्या चिकित्सेसोबतच अभ्यासली गेलेली आहे.

## मध्ययुगातील दन्तशल्यचिकित्सा -

मध्ययुगात युरोपमध्ये दन्तसेवा श्रीमंत रुग्णांसाठी घरोघरी जाऊन दिली जात असल्याचे उल्लेख आहे. १४०० ए.डी. मधील दाखले आहेत की, इजिप्तमध्ये दातांच्या खड्ड्यांमध्ये सोन्याची पाने भरली जात होती.

Pierre Fauchard (१६७८ - १७६१) या फ्रेंच शल्य चिकित्सकाकडे 'Father of Modern Dentistry' असण्याचे श्रेय जाते. John Hunter नामक इंग्रजी सेनेतील एका शल्य चिकित्सकाने Natural History of Human teeth, (1771) व Practical Treatise on the diseases of the teeth (1778) अशी लोकप्रिय पुस्तके लिहिली आहेत.

Dr. Horace Wells या Connecticut येथील दंतवैद्याने १८४४ साली Nitrous Oxide या वायूचा भूल देण्यासाठी उपयोग करून दात काढल्याचे दाखले आहेत.

दन्तवैद्यकशास्त्र अमेरिकेत १८ व्या शतकात आले. Greene Vardiman Black (१८३१ - १९१५) याच्याकडे अमेरिकन दन्तशल्य चिकित्साशास्त्राच्या विकासाचे श्रेय जाते.

-Dentisty an Illustrated History या पुस्तकातून

## आधुनिक दन्तशल्य चिकित्सा शास्त्र -

आधुनिक दन्तशल्यचिकित्सा अत्यंत प्रगत अवस्थेत आहे. यांत्रिक उपकरणे, विविध औषधे व आधुनिक चिकित्साशास्त्र यांच्या सहाय्याने आजचे दन्तवैद्य दन्तरोगप्रतिबंध व चिकित्सा अतिशय सुलभ रीतीने करू शकतात. शतकानुशतके केल्या गेलेल्या अविरत प्रयत्नांचे मूर्तरूप म्हणजेच आजची उपलब्ध दन्तचिकित्सा. आनुवंशिकता, इतर शारीरिक रोगांमुळे होणारे दंत रोग व मुखरोग, मुखातील बदलांचा शरीरातील इतर बदलांशी असलेला संबंध आदी अनेक गोष्टी आता प्रगतीशील विज्ञानामुळे स्पष्ट होत आहे व त्या दिशेने समाजाला दन्त-मुख-रोग मुक्त करण्यासाठी आधुनिक दन्तशल्य चिकित्सक प्रयत्नशील आहेत.

## भारतातील दन्तशल्यचिकित्साशास्त्र -

भारतातील आरोग्य शास्त्राच्या ज्या अनेक पद्धती आहे त्यापैकी आयुर्वेद ही एक पद्धत आहे. प्रस्तुत लघुशोध निबंधात दन्तशल्यचिकित्सा शास्त्राचा प्रामुख्याने आयुर्वेद शास्त्रानुसार विचार केलेला असल्याने भारतीय चिकित्सांचा विचार करत असताना याठिकाणी केवळ आयुर्वेदाचाच संदर्भ घेतला आहे.

आयुर्वेद हा पुरातन विषय आहे. आयुर्वेदाचा इतिहास आज तीन स्वरूपात अपेक्षित आहे. विषयानुसार, कालक्रमानुसार व संशोधनात्मक. विषय विभागात रोग व वनस्पतींचा इतिहास अपेक्षित धरणे आवश्यक आहे. आयुर्वेद इतिहास निर्मितीतील स्रोत विविध आहेत. उदा. वाङ्मय स्रोत, पुराणतात्विक स्रोत, मुद्राशास्त्रीयस्रोत, अभिलेखीय स्रोत, उत्खननाधिगत स्रोत, परकीय यात्रेकरूंचे कथन, स्थापत्य कलेचे अवशेष, पांडुलिपी आदि.

समस्त भारतीय वाङ्मयात वैदिक वाङ्मयाला अग्रणी व पवित्र मानले जाते. वेद धर्मग्रंथ आहेत. त्यात मानवी जीवनाच्या सर्व समस्यांचे समाधान केले आहे. आयुर्वेद शाश्वत, पुण्यतम वेदांग आहे. हा अथर्ववेदाचा उपवेद आहे. कारण अथर्ववेदात आयुर्वेदीय विषय अधिकप्रमाणात आहेत. आयुर्वेद लोकांकरिता हितकारक आहे. ब्रह्मवैवर्त पुराणात आयुर्वेदाला पंचमवेद मानले आहे. ऋग्वेदातील सुक्तांमध्ये अश्विनीकुमारांनी केलेल्या दंतचिकित्सेचे उल्लेख आहेत. (ऋ. २-१३)

भारतीय आयुर्वेद चिकित्सेत 'धन्वन्तरी' ही देवता मानण्यात येते. आयुर्वेदाच्या मूळ स्रोताच्या उदयाचे संशोधन केल्यास धन्वन्तरी (१६००-१२०० इ.पू.), दिवोदास, कश्यप, आत्रेय, अग्नीवेष, भेड, सुश्रुत आदी आचार्यांची ग्रंथसंपदा उपलब्ध आहे. आयुर्वेदातील परंपरेत बृहत्रयी (चरक, सुश्रुत, वाग्भट) व लघुत्रयी (माधवनिदान, शारङ्गधर संहिता, भावप्रकाश) व भेलसंहिता, हारित संहिता आदि इतर ग्रंथांचा समावेश आहे. या सर्व ग्रंथात शरीर, त्यातील अवयव, त्यांचे रोग निदान व चिकित्सा विस्ताराने लिहिलेले आहेत. या सर्व ग्रंथांमध्ये दंतरोग व या रोगांच्या चिकित्सेविषयीचे अत्यंत सूक्ष्म विवरण आहे. यावरून हे स्पष्ट होते की, प्राचीन काळात भारतीय वैद्यक शास्त्रात दन्त वैद्यक शास्त्र ही जरी एक वेगळी शाखा मानली जात नव्हती तरी दातांचे आरोग्य व त्याचे शारीरिक आरोग्याच्या दृष्टीने महत्त्व प्राचीन आयुर्वेदाचार्यांना जाणवलेले होते व म्हणूनच त्यांनी दंतवैद्यक शास्त्राचा इतका खोलवर विचार केलेला आहे.

## आयुर्वेदशास्त्रातील महत्त्वाचे ग्रंथ व ग्रंथकार -

### चरकसंहिता -

उपलब्ध चरक संहिता तीन स्तरात पूर्ण झाली. आत्रेय, याच्या सहा शिष्यात अग्निवेश प्रमुख होते. अग्निवेश यांनी अत्रेयांच्या उपदेशांना ग्रंथरूप देऊन अग्निवेशतंत्र तयार केले. हा प्रथमस्तर आहे जो उपनिषद काळामध्ये आहे.(इ.स. पूर्व १०००) त्याचा विस्तार आचार्य चरक यांनी केला. हा द्वितीय स्तर.यांचा काल शुंगकाळ म्हणजेच इ.स.पूर्व द्वितीय शताब्दी. त्यानंतर आचार्य दृढबल यांनी या ग्रंथावर प्रतिसंस्कार केले हा तृतीय स्तर झाला. (इ.स.पूर्व पहिली शताब्दी)

**सुश्रुतसंहिता -**

धन्वन्तरीच्या उपदेशाला संग्रहित करून सुश्रुताने सुश्रुत संहिता तयार केली. द्वितीय शताब्दी. सुश्रुत नावाचे दोन आचार्य आहेत. वृद्ध सुश्रुत इ.स. पूर्व १५०० ते १००० व सुश्रुत (यांचा काळ शाकवाहन साम्राज्यकाळ, दुसरी शताब्दी) विद्वानांच्या मते दिवोदास धन्वन्तरीचे शिष्य वृद्ध सुश्रुत होते. सर्वप्रथम त्यांनी सुश्रुत तंत्राची रचना केली. त्याचा प्रतिसंस्कार द्वितीय सुश्रुताने केला व या ग्रंथास सुश्रुत संहिता हे नाव दिले. नंतर नागार्जूनाने पाचव्या शताब्दीमध्ये याच संहितेला उत्तर तंत्र जोडून प्रतिसंस्कार केला. १० व्या शताब्दी ने चंद्रटने याला नवीन रूप दिले व आजची उपलब्ध संहिता प्राप्त झाली.

**वाग्भट -**

ग्रंथकार वाग्भटाने (७ वी शताब्दी) अष्टांगहृदय व अष्टांग संग्रह असे दोन ग्रंथ लिहिले. यामध्ये चरक व सुश्रुत या दोहोंच्या ग्रंथांमधील वेचक उतारे घेऊन त्यावर स्वरचित श्लोकांची भर घातलेली आहे.

**माधवाचार्य -**

माधवाचार्यांचा काळ ७ व्या शताब्दीचा आहे. यांनी माधवनिदान हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाचे मूळ नाव 'रोग विनिश्चय' असे आहे. या आचार्यांनी अनेक प्राचीन ऋषींच्या उपदेशांना संग्रहीत करून हा ग्रंथ लिहिलेला आहे.

**शारङ्गधर -**

शारङ्गधर यांचा काळ १३ व्या शताब्दीचा आहे. या काळामध्ये अनेक आचार्य होते ज्यांचे नाव 'शारङ्गधर' होते. काही दार्शनिक, ज्योतिष्तज्ञ, नाटककार व आयुर्वेदतज्ज्ञ होते. यापैकी दामोदरपुत्र शारङ्गधर हे वैद्य होते. यांनी 'शारङ्गधर' संहितेची रचना केली.

**भावमिश्र -**

भावमिश्र यांचा काळ १६ वी शताब्दी होती. यांनी रचलेल्या ग्रंथाचे नाव 'भावप्रकाश' असे आहे. यांच्या या ग्रंथात नवीन औषधांचा समावेश करून विविध विषयांचा विकास केलेला आहे. आयुर्वेदीय लघुत्रयीमधील हा शेवटचा ग्रंथ आहे.

**भेड -**

अग्निवेशाचा वर्गबंधू व आत्रेयांच्या सहा शिष्यांपैकी एक असलेला भेड ह्याने 'भेल' संहिता लिहिली.

**हारित -**

हा देखील अग्निवेशाचा समकालीन आहे. १८८७ मध्ये हारित संहिता कलकत्याहून प्रकाशित झाली. भाषा व लेखन पद्धती अग्निवेश संहितेसारखीच आहे. पण यात आधुनिक ग्रंथांचा पण उल्लेख आहे.

**कश्यप -**

कश्यप संहितेचे हस्तलिखित तिबेटमधून मिळाले आहे. इन्द्रापासून कश्यप, भृगु, वशिष्ट, अत्री यांनी वैद्यक विद्येचे अध्ययन केले असे मानले जाते. कश्यपापासून त्याचे शिष्य व पुत्र यांनी अध्ययन केले. ही वैद्यक शाखा बालरोगांसंबंधी आहे व या शाखेची कश्यपसंहितेशिवाय दुसरी संहिता उपलब्ध नाही. कश्यपाने लिहिलेल्या 'कौमारभृत्या'वर वृद्ध जीवकाने काही संस्कार केले. त्यानंतर वात्स्य (४ थी शताब्दी) याने प्रति संस्कार केले. कश्यपसंहितेचा उपदेष्टा मारीच कश्यप आहे. कश्यप संहितेतील भेल, नग्नजित आदि आयुर्वेदाचार्य शतपथ ब्राह्मणकाळातील आहेत.

– आयुर्वेदाचा इतिहास या पुस्तकातून.

आयुर्वेदाची परंपरा व संप्रदायक्रम परिशिष्ट क्रमांक २ मध्ये निर्दिशिला आहे.

*****

**भावमिश्र -**

भावमिश्र यांचा काळ १६ वी शताब्दी होती. यांनी रचलेल्या ग्रंथाचे नाव 'भावप्रकाश' असे आहे. यांच्या या ग्रंथात नवीन औषधांचा समावेश करून विविध विषयांचा विकास केलेला आहे. आयुर्वेदीय लघुत्रयीमधील हा शेवटचा ग्रंथ आहे.

**भेड -**

अग्निवेशाचा वर्गबंधू व आत्रेयांच्या सहा शिष्यांपैकी एक असलेला भेड ह्याने 'भेल' संहिता लिहिली.

**हारित -**

हा देखील अग्निवेशाचा समकालीन आहे. १८८७ मध्ये हारित संहिता कलकत्याहून प्रकाशित झाली. भाषा व लेखन पद्धती अग्निवेश संहितेसारखीच आहे. पण यात आधुनिक ग्रंथांचा पण उल्लेख आहे.

**कश्यप -**

कश्यप संहितेचे हस्तलिखित तिबेटमधून मिळाले आहे. इन्द्रापासून कश्यप, भृगु, वशिष्ट, अत्री यांनी वैद्यक विद्येचे अध्ययन केले असे मानले जाते. कश्यपापासून त्याचे शिष्य व पुत्र यांनी अध्ययन केले. ही वैद्यक शाखा बालरोगांसंबंधी आहे व या शाखेची कश्यपसंहितेशिवाय दुसरी संहिता उपलब्ध नाही. कश्यपाने लिहिलेल्या 'कौमारभृत्या'वर वृद्ध जीवकाने काही संस्कार केले. त्यानंतर वात्स्य (४ थी शताब्दी) याने प्रति संस्कार केले. कश्यपसंहितेचा उपदेष्टा मारीच कश्यप आहे. कश्यप संहितेतील भेल, नग्नजित आदि आयुर्वेदाचार्य शतपथ ब्राह्मणकाळातील आहेत.

– आयुर्वेदाचा इतिहास या पुस्तकातून.

आयुर्वेदाची परंपरा व संप्रदायक्रम परिशिष्ट क्रमांक २ मध्ये निर्दिशिला आहे.

*****

# प्रकरण - २

# दन्तोद्भेद

काश्यपसंहितेच्या 'दन्तजन्मिक' अध्यायात इतर मुनी व भगवान कश्यप ह्यांचे दातांसंबंधीचे प्रश्नोत्तर रूपाने विवेचन आहे.

अथोवाच भगवान कश्यप : -

इह खलु नृणा द्वात्रिंशदन्ता:; तत्राष्टौ सकृज्जाता: स्वरूढदन्ता भवन्ति, अत: शेषा द्विजा:। योवत्स्वेव च मासेषु दन्ता निषिच्यन्ते तावत्सवह: सूद्भिद्यन्ते। यावत्सेव च मासेषु जात्सय सत उद्भिद्यन्ते तावत्स्वेव च वर्षेषु पतिता: पुनरूद्भिद्यन्ते। तत्र मध्ये द्वावुत्तरौ राजदन्तसंज्ञौ भवत:, तौ पवित्रौ, तस्मात्ताभ्यां खण्डे न श्राद्धमर्हति अपपित्रो हि स:। तयोरूभयत: पार्श्वयोरपि वस्तौ, तयोरपि दंष्ट्रे शेषा: स्वरूढा हानव्या इति चोच्यन्ते, तथाऽधस्तात्।।[१]

भगवान कश्यप सांगतात - मनुष्याचे बत्तीस दात असतात. यामधे आठ 'सकृज्जात' म्हणजे केवळ एकदाच उत्पन्न होणारे असतात व बाकीचे चोवीस 'द्विज' म्हणजे दोन वेळा येतात. ज्या महिन्यात दातांचे निर्वचन होते, तितक्याच दिवसात ते बाहेर येतात. जर चार महिन्यात दांत निषिक्त होत असले तर चार दिवसात ते बाहेर येतात. बालकाच्या जन्मानंतर ज्या महिन्यात दात येतात, वयाच्या त्याच वर्षात ते दात पडून नवे दांत येतात. म्हणजे वयाच्या सहाव्या महिन्यात तोंडात दिसू लागलेले दांत वयाच्या सहाव्या वर्षीच पडतात. वरील जबड्यातील मधल्या दोन दातांना 'राजदन्त' (मध्यत्रोटक Central Incisors) म्हणतात. त्या राजदन्तांच्या दोन्ही बाजूंना 'बस्त' (Lateral incisors) असतात व त्यांच्या दोन्ही बाजूला 'दंष्ट्रा' (शीवनकीलक Canine, eye teeth) असतात. अशाप्रकारे हे सहा दांत झाले. शेष दांत स्वरूढ (आपल्या स्वस्वरूपात वाढणारे) 'हानव्य' अर्थात हनुप्रदेशांत असणारे चर्वण दांत (Bicuspids and molars) असतात.

हे एकंदर चार असतात.सर्व मिळून दहा झाले. अशाच प्रकारे खालच्या जबड्यात देखील दहा दात असतात. नवे दात वीस हानव्य व बारा शेष असे एकंदर बत्तीस दांत होतात.

आधुनिक मतानुसार देखील दन्तोद्भेद दोन प्रकारचा मानला जातो.

(१) बाल्यावस्था – अस्थायी दूध दांत Deciduous teeth

(२) किशोरावस्था – स्थायी दात Permanent teeth

तत्र कुमारीणामाशुतरमल्पबाधकरं च दन्तजन्म, सुषिरत्वाद्दंशानां मृदुस्वभावाच्च, प्रकृष्टकालमाबाधाबहुलं तु कुमाराणामाचक्षते, घनत्वाद्दंशानां स्थिरस्वभावाच्च। दन्तानां निषेकमूर्तित्वोद्भेदवृद्धिपतनपुनर्भावनिवृत्तिस्थितिपरिक्षयचलनपतनदृढदुर्बलता जातिविशेषान्निषेकात् स्वभावान्मातपित्रोरनुकरणात् स्वकर्मविशेषाच्चेत्याचक्षते महर्षयः, तथाऽन्येऽपि शरीरवृद्धिऱ्हास-गुणदोषप्रादुर्भावाः ।।[२]

मुलींचे दांत लवकर व कमी कष्ट होऊन निघतात. कारण त्यांचे दांत सुषिर – सच्छिद्र व मृदु असतात. मुलांचे दांत उशिराने व त्रास देऊन निघतात. कारण त्यांचे दांत घन व स्थिर, दृढ असतात. दातांचा निषेक, मूर्तरूप होणे, प्रकट होणे, वृद्धि, पतन, पतनानंतर पुनश्च न येणे, स्थिर राहणे, क्षीण होणे, हलणे, पडणे, दृढता, दुर्बलता या सर्वांमधे जातीची विशेषता, निषेक, स्वभाव, मातापिता यांचे अनुकरण (heredity) तथा स्वत:चे प्राक्तन कर्म या कारणांनी होते, असे प्राचीन महर्षी सांगतात. याच कारणांनी शरीरातील अन्य वृद्धी, ऱ्हास, गुण, दोष आदि उत्पन्न होतात.

आधुनिक मतानुसार देखील दांत, त्यांची ठेवण, त्यांचे गुणदोषादि प्रकृती व प्रवृत्ती तसेच शरीरातील इतर अवयवांची ठेवण, गुण-दोषादि प्रवृत्ती या आनुवंशिकतेने उचलल्या जातात.

नृणां तु चतुर्थादिषु मासेषु दन्ता निषिच्यन्ते। तत्र सदन्तजन्म च, पूर्वमुत्तरदन्तजन्म च, विरलदन्तजन्म च, हीनदन्तता च, अधिकदन्तता च, करालदन्तता च, विवर्णदन्तता च, स्फुटितदन्तता चामङ्गल्या भवति। तत्र शान्त्यर्थं मारूतीमिष्टि निर्वपेत्, स्थालीपाकमनाहिताग्नेः प्राजापत्यमित्येके तथाऽन्येष्वपि स्वाङ्गोनाधिकभावेषु तथा तद्धोरं प्रशाम्यति ।।[३]

पुरुषांचे दांत वयाच्या चौथ्या महिन्यात निषिक्त होतात. सदन्तजन्य (दातांसहीत जन्मलेला) प्रथम वरच्या जबड्यातील दातांचे उगवणे, दातांचे विरळ (दूर-दूर) असणे, कमी दांत असणे (Anodotia - partial/full), अधिक दांत असणे, दांत कराल (लांब) असणे, दांत मळकट असणे व दातांचे स्फुटित होणे हे सर्व अशुभ मानले जाते. याच्या शान्तिकरिता मारुतियज्ञ करावा. काही लोक सांगतात की, अनाहिताग्नि पुरुषांची स्थालीपाक (पुरोडाश) प्रजापत्य यज्ञाने करावी. अशा यज्ञाने अनिष्टाची शांती करावी.

आधुनिक मतानुसार वरील मताच्या दन्तविषयक शुभाशुभाला मान्यता नाही. विविध प्रकारच्या उपकरणांनी व पद्धतींनी अशाप्रकारच्या दोषांचे निवारण करता येते.

चतुर्विधं तु दन्तजन्माचक्षते सामुद्गं, संवृतं, विवृतं, दन्तसंपदिति। तत्र सामुद्गं क्षयि नित्यसंपातात् संवृतमधन्यं मलिनं विवृतं वितमनित्यलालोपहतमसंछन्नदन्तत्वादाशुदन्तवैवर्ण्यकरमासन्नाबाधमिति ।।४

चार प्रकाराच्या दातांची उत्पत्ती मानली जाते. (१) सामुद्ग (२) संवृत (३) विवृत (४) दन्तसम्पत्. यापैकी 'सामुद्ग' लहान मुलांच्या दंतक्षयावस्थेत असतात. कारण त्यांचे दांत नेहमी पडत असतात. 'संवृत' दात अधन्य, अप्रशस्त असतात. कारण यामध्ये दांत मळकट असतात. 'विवृत' हा प्रकार तेव्हा असतो जेव्हा नित्य लालास्राव (Salivation) होत राहतो व दात ओठांनी पूर्णपणे झाकलेले नसतात. त्यामुळे त्यांच्यावर मळाचा थर जमा होत राहतो व त्यामध्ये दंतरोग होण्याची शक्यता जास्त असते. 'दन्तसंपत'म्हणजे उत्तम निरोगी दांत.

आधुनिक मत यापेक्षा फारसे वेगळे नाही.

चतुर्थे तु मासि दन्ता निष्क्रिता दुर्बला भवन्त्याशुक्षयिणश्चामयबहुलाश्च, पञ्चमे स्यदनाश्च प्रहर्षिणश्चामयबहुलाश्च षष्ठेक प्रतीपाश्च मलग्राहिणश्च विवर्णाश्च घुणदन्ताश्च भवन्ति, सप्तमे द्विपुटाः स्फोटिनश्च राजिमन्तश्च खण्डाश्च रूक्षाश्च विषमाश्चोन्नताश्च भवन्ति, तथा ऽष्टमे मासि सर्वगुणसंपन्ना भवन्ति। पूर्णता समता घनता शुक्लता स्निग्धता श्लक्ष्णथा निर्मलता निरामयता किञ्चिदुत्तरोन्नतता, दन्तबन्धनानां च समता रक्तता स्निग्धता बृहद्घनस्थिरमूलता चेति दन्तसम्पदुच्यते। हीनोल्बण-सितासिताऽप्रविभक्तदन्तबन्धनत्वमप्रशस्तमृषयो वदन्ति। तत् स्वभावाद्दन्तोदूखलकेषु यच्छोणितं गर्भे निषिक्तं तदेव जातस्य समतोऽभिवर्धमानस्य क्रमेण ......[५] इथे ग्रन्थ खण्डित आहे.

चतुर्थ मासामध्ये निषिक्त झालेले दांत दुर्बल, शीघ्रपतन होणारे किंवा रोगयुक्त असतात. पांचव्या मासामधे निषिक्त झालेले दांत हलणारे हर्ष[६] वा अन्य रोगांनी युक्त असतात. सहाव्या मासामध्ये निषिक्त झालेले दांत प्रतीप-तिरपे, मळके, विवर्ण, कीड लागलेले असतात. सातव्या महिन्यात निषिक्त झालेले दांत दोन पुट असलेले (दोन दांत एकत्र निघणे), तुटणारे रेखायुक्त, तुटलेले, रुक्ष, विषम (समानता नसणारे) व समोरील बाजूस उंचावलेले असतात. आठव्या महिन्यात निषिक्त झालेले दांत सर्वगुणसंपन्न असतात. दातांची पूर्णता, समानता, कठोरता, शुभ्रता, स्निग्धता, गुळगुळीतपणा, निर्मलता, निरोगता, किंचित उभार असलेले असतात. तसेच या वेळी निषिक्त झालेल्या दातांभोवतीचे दंतबंधन (हिरड्या) समान लाल, स्निग्ध तथा दाट असतात. हे दांत हिरड्यांमध्ये स्थिर असतात. ह्यांना दंतसम्पत (दातांचे गुण) म्हणतात. दांत कमी (हीन) असणे, उल्वण (अधिक) असणे, सित (एकदम शुभ्र असणे), असित (काळे) असणे, प्रत्येक हिरडी वेगवेगळी नसणे हे सर्व अप्रशस्त मानले जाते. दातांच्या खड्ड्यांमध्ये (Pits) गर्भाच्या वेळेस जे रक्त स्वाभाविकपणे निषिक्त होते तेच रक्त उत्पन्न होऊन समान रूपाने वाढणाऱ्या व्यक्तिमधे असते व दांत उत्पन्न करते.

दन्तोद्भेदाविषयी लिहिले आहे -

पुष्यंगे विडालानां बर्हिणां शिखरोद्गमे ।
दन्तोद्भेदे च बालानां न हि किञ्चित्र दूयते ।।[७]

दन्तोद्भेदेषु रोगेषु न बालमतियन्त्रयेत् ।
स्वयमेवोपशाम्यति जातदन्तस्य ये गदाः ।।[८]

दन्तोभेदाच्या समयी मुख्य उपद्रव (१) ज्वर व (२) वमन या रूपाने होतात. दन्तोद्भेदसमयीचे उपद्रव जर विशेष प्रबल रूपात नसले तर विशेष उपक्रमाची आवश्यकता नाही. दांत उगवल्यावर उपद्रव स्वयं शान्त होतात.

आधुनिक मतानुसार बालकांना मुखामधे दातांचे प्रकटीकरण होण्याच्या समयी अनेक आजार होऊ शकतात. परंतु या आजारांविषयी दोन मतप्रवाह आहेत. (१) दात येण्याच्या समयी बालकांना निश्चितपणे अपचन, उलटी आदि त्रास होतात. (२) या विकारांचा दंतोद्भेदाशी प्रत्यक्ष संबंध नसून पचनापचनाच्या आंतरिक शारीरिक बदलामुळे (Internal metabolic disturbances) हे विकार होतात.

आजच्या आधुनिक काळात उपलब्ध असलेल्या वैज्ञानिक साधनांचा प्राचीन काळी अभाव होता हे निश्चित. इतर काही संशोधन पद्धती त्या काळी निश्चितच असतील. परंतु त्याविषयीचे खात्रीलायक ज्ञान आज उपलब्ध नाही. तीव्र निरीक्षणशक्तीवर आधारित असे दंतोद्भेदासंबंधीचे काश्यपमुनींचे वक्तव्य आधुनिक दन्तशल्यचिकित्साशास्त्राच्या निकषावर संपूर्णपणे योग्य ठरते.

दन्तोद्भेदसमयी बालकांना जो त्रास होतो – (ज्वर, वमन, अतिसार आदि) तो दांत तोंडात आल्यावर आपोआपच बंद होतो. साधारणपणे या काळात बालकाच्या भोजनावर जास्त लक्ष देणे आवश्यक आहे. या काळामध्ये पचनास सोपे असे भोजन द्यावे. या वेळेस हिरड्यांवर मध लावून हलके हलके मालिश करावे. हिरड्यांना ग्लिसरीनचा मसाज देखील उपयोगी पडतो. चोखण्यासाठी बालकाला एखादी कठीण वस्तू (जी टोकदार पण नसावी व गिळण्याइतपत लहान पण नसावी) द्यावी. जेणेकरून हिरड्यांच्या कंडाचे शमन होईल. पचनाच्या बारीक तक्रारींसाठी ग्राईप वॉटरसारखे द्रवपदार्थांचा उपयोग करता येईल.

*****

# संदर्भसूची

१. का. सं. २०/४

२. तदेव २०/५

३. तदेव २०/६

४. तदेव २०/७

५. तदेव २०/ताडपत्र पुस्तके ३४ तमं पत्रम्

६. तदेव २०/पृ.२०

७. तदेव २०/पृ.२०

८. तदेव २०/पृ.२१

# प्रकरण - ३

# दन्तरोग निदान

आर्ष ग्रंथांपैकी चरकाच्या ग्रंथामध्ये कायचिकित्सा उत्तम सांगितली आहे. सुश्रुताच्या ग्रंथामध्ये नेत्रादिरोग व शल्यचिकित्सा उत्तम सांगितलली आहे. वाग्भटाचे विशेष हे आहे की त्याने कायचिकित्सा प्राय: चरकसंहितेतून व इतर अंगे सुश्रुतादि ग्रंथातून घेऊन त्यांची उत्तम प्रकारे जुळणी केलेली आहे.

वाग्भट हा स्वतंत्र ग्रंथ नसून प्राचीन ऋषींच्या ग्रंथांमधील जी जी अंगे उत्कृष्ट दिसली त्यांचे व्यवस्थित संग्रहण केलेला ग्रन्थ आहे. त्यात शब्द मूळ ग्रंथातलेच असून जुळणीक्रम मात्र भिन्न आहे. क्वचितस्थळी तदर्थसूचक स्वरचित श्लोक आहेत. प्रस्तुत शोधनिबंधात दन्तरोगोपचारसंबंधी माहिती वाग्भटाच्या 'अष्टांगहृदय' या ग्रंथातून घेतली आहे.

वातादुष्णसहा दन्ता: शीतस्पर्शाधिकव्यथा: ।।<br>
दाल्यन्त इव शूलेन शीताख्यो दालनश्च स ।।[१]

वायूने दातांस उष्ण पदार्थ सोसतो, परंतु थंडापासून जास्त वेदना होते. आंत शूल असतो त्यामुळे फोडल्यासारखे वाटते. याला 'शीतदन्त' किंवा 'दालन' (Tooth Ache) असे म्हणतात.

दन्तहर्षे प्रवाताम्लशीतभक्ष्यासहा द्विजा: ।।<br>
भवन्त्यम्लाशनेनैव सरूजाश्चलिता इव ।[२]

फार वारा, आंबट, थंड व भक्ष्य (चावून खाण्याचे पदार्थ) हे सोसत नाहीत. कळा लागतात व ते हलल्यासारखे वाटतात. त्यास 'दन्तहर्ष' (Odontitis) असे म्हणतात. हा आंबट खाण्याने होतो.

दन्तभेद द्विजास्तोदभेदरूक्स्फुटनान्विता: ।।[३]

दातांस टोचणी, फूट, ठणका व चिरा पडणे हे ज्यात असतात, त्या विकारास 'दन्तभेद' (Cracked Tooth) म्हणतात.

चालश्चलद्भिर्दशनैर्भक्षणादधिकव्यथैः ।[४]

दात हालतात व खाल्याने ज्यात अधिकच कळ लागते. त्या विकारास 'दन्तचाल' (Mobile Tooth) असे म्हणतात.

करालः सुकरालानां दशनानां समुद्भवः ।।[५]

वेडेवाकडे व दांडगे असे जे दांत येतात, त्यांना 'कराल' (Huge Tooth) असे म्हणतात.

दन्तोऽधिकोऽधिदन्ताख्यः स चोक्तः खलु वर्धनः ।

जायते जायमानेऽतिरुग् जाते तत्र शाम्यति ।।६

दातांवर जो दुसरा दात येतो त्यास 'वर्धन' किंवा 'अधिदन्त' (Mesiodens/ Extra Tooth)म्हणतात. तो येऊ लागला की फार ठणका लागतो व तो आला की ठणका बरा होतो.

अधावनान्मलो दन्ते कफो वा वातशोषितः ।

पूतिगन्धः स्थिरीभूतः शर्करा सोप्युपेक्षितः ।।[७]

दांत न घासल्यास त्यावर वायूने मळ किंवा कफ वाळून घट्ट बसतो व त्यास घाण येते या विकारास 'शर्करा' (Plaque)असे म्हणतात.

शातयत्यणुशो दन्तात्कपालानि कपालिका ।[८]

शर्करेची हयगय केली की दातांतून बारीक कपले निघतात. त्यास 'कपालिका' (Tartar)म्हणतात.

श्यावः श्यावत्वमायाता रक्तपित्तानिलैर्द्विजाः ।।[९]

रक्त पित्त व वायू यांनी दात काळे होतात. त्याला 'श्यावदन्त' (Dead Tooth)असे म्हणतात.

समूलं दन्तमाश्रित्य दोषैरूल्बणमारुतैः ।

शोषिते मज्ञि सुषिरे दन्तेऽन्नमलपूरिते ।।

पूतित्वा कृमयः सूक्ष्मा जायन्ते जायते ततः ।

अहेतुतीव्रार्ति शमः ससंरम्भोऽसितश्चलः ।।

प्रभूतपूयरक्तस्तु स चोक्तः कृमिदन्तकः ।[१०]

वायू ज्यात अधिक आहे अशा तीनही दोषांनी मुळासकट दातांचा आश्रय करून मज्जेचे शोषण केल्याने दांत पोकळ होतात व यात अन्न किंवा मळ भरला असताना दुर्गंधी सुटून त्यापासून त्यात बारीक कृमी होतात व त्याच्या योगाने कारणावाचून दातांत कळ लागते, दात सुजतो, काळा होतो, हलतो, पु व रक्त पुष्कळ वाहते. या विकारास 'कृमिदन्तक' (Dental Caries) म्हणतात.

श्लेष्मरक्तेन पूतीनि वहन्त्यस्रमहेतुकम् ।।

शीर्यन्ते दन्तमासानी मृदु क्लिन्नासितानि च ।

शीतादोऽसौ ---[११]

कफ व रक्त यापासून हिरड्या विशीर्ण (फुटल्या सारख्या) होतात. त्यांस दुर्गंधी येते, कारणावाचून रक्त वाहते, त्या मऊ क्लेदयुक्त व काळया होतात या विकारास 'शीताद' (Gingivitis)म्हणतात.

उपकुशः पाकः पित्ता सृगुद्भवः ।।

दन्तमासानि दह्यन्ते रक्तान्युत्सेधवन्त्यतः ।

कण्डूमन्ति स्रवन्त्यस्रमाध्मायन्तेऽसृजि स्थिते ।।

चला मन्दरूजो दन्ताः पूति वक्त्रं च जायते ।[१२]

पित्त व रक्त यांच्यापासून जो पाक होतो त्याला 'उपकुश' (Pyrorrhoea)म्हणतात. यात हिरड्यांचा दाह होतो. त्या लाल होतात. सूजतात, खाजतात, त्यांतून रक्त वाहते व ते रक्त वाहवयाचे बंद झाले म्हणजे त्या हिरड्या फुगतात, दांत हलतात, त्यांत थोडी वेदना असते व तोंडास घाण येते.

दन्तयोस्त्रिषु वा शोफो बदरास्थिनिभो धनः ।।

कफास्रात्तीव्ररूक् शीघ्रं पच्यते दन्तपुप्पुटः ।[१३]

दोन किंवा तीन दांतात 'कफ' किंवा रक्त यापासून बोराच्या बीप्रमाणे कठीण सूज येते, फार ठणका व पाक असतो. याला 'दन्तपुप्पुट' (Periapical abscess) म्हणतात.

दन्तमासे मलैः सास्रैर्बाह्यान्तःश्वयथुर्गुखः ।।

सरुदाहः स्रवेद्भिन्नः पूयास्रं दन्तविद्रधिः ।[१४]

वात, पित्त, कफ व रक्त यापासून हिरड्यात आंत व बाहेर मोठी सूज येते. तीत ठणका व दाह असतो व फुटल्यानंतर रक्त व पू वाहतो, त्यास 'दन्तविद्रधि' (Tumor) असे म्हणतात.

श्वयथुर्दन्तमुलेषु रूजावान् पित्तरक्तजः ॥

लालास्रावी च सुषिरो दन्तमांसप्रशातनः ।[१५]

दातांची मुळे पित्त व रक्त यामुळे सुजतात. त्यांना ठणका फार असतो. लाळ फार वाहते व हिरड्यांचे मांस सडते. यास 'सुषिर' (Periodontitis) असे म्हणतात.

स सन्निपातज्वरवान्सपूयरूधिरस्रुतिः ॥

महासुषिर इत्युक्तो विशीर्णद्विजबन्धनः ।[१६]

ज्यात सन्निपातज्वर, रक्त व पू यांचा स्राव असून दन्तबन्धने तुटतात त्या विकारास 'महासुषिर' (Periodontosis) असे म्हणतात.

दन्तान्ते किलवच्छोफो हनुकररूजाकरः ॥

प्रतिहन्त्यभ्यवहर्तिं श्लेष्मणा सोऽधिमांसकः ।[१७]

दातांच्या शेवटी खिळ्यासारखी सूज येते. त्यामुळे हनुवटी व कान यांना ठणका लागतो व अन्न खाण्यास अडथळा होतो. या विकार कफापासून होतो व याला 'अधिमांस' (Pericoronitis) असे म्हणतात.

घृष्टेषु दन्तमांसेषु संरम्भो जायते महान ॥

यस्मिंश्चलन्ति दन्ताश्च स विदर्भोऽभिघातजः ।[१८]

हिरड्या घासल्या गेल्याने फार क्षोभ होऊन दात हलतात. हा विकार अभिघातजन्य असून त्यास 'विदर्भ' (Traumatic wound) म्हणतात.

दन्तमांसाश्रितान्रोगान् यः साध्यानप्युपेक्षते ॥

अन्तस्तस्यास्रवन् दोषः सूक्ष्मां सञ्जनयेद्गतिम् ।

पूयं मुहुः सा स्रवति त्वङ् मांसास्थिप्रभेदिनी ॥

ताः पुनः पञ्च विज्ञेया लक्षणैः स्वैर्ययोदितैः ।[१९]

हिरड्यातील रोग साध्य असूनही जर त्यांची उपेक्षा केली तर पू आत शिरून बारीक नाडीव्रण उत्पन्न करतो. ज्यामधून वारंवार पू वहतो. त्वचा, मांस व हाड यांचा तो भेद करतो. हे नाडीव्रण पाच प्रकारचे आहेत व सामान्य नाडीव्रणाप्रमाणे त्यांची प्रत्येकाची वेगवेगळी लक्षणे आहेत.

पूत्यास्यता च तैरेव दन्तकाष्ठादिविद्विषः ।
ओष्टे गण्डे द्विजे मूले जिव्हायां तालुके गले ।।
वक्त्रे सर्वत्र चेत्युक्तः पञ्चसप्ततिरामयाः ।
एकादशैको दश च त्रयोदश तथा च षट् ।।
अष्टावष्टादशाष्टौ च क्रमात्.[२०]

याप्रमाणे ११ ओष्ठरोग, १ गंडरोग, १० दंतरोग, १३ दन्तमूलरोग, ६ जिह्वारोग, ८ तालुरोग, १८ गलरोग व ८ सर्वगत मुखरोग असे एकंदर ७५ मुखरोग सांगितले.

तेष्वनुपक्रमाः ।
करालौ मांसरक्तौष्ठावर्बुदानि जलाद्विना ।।
कच्छपस्तालुपिटिका गलौघः सुषिरो महान् ।
स्वरघ्नार्ध्वगदश्यावशतघ्नीवलयालसाः ।।
न्याड्योष्टकोपौ निचयाद्रक्तात्सर्वैश्च रोहिणी ।
दशने स्फुटिते दन्तभेदः पक्वोपजिह्विका ।।
गलगण्डः स्वरभ्रंशी कृच्छ्रोच्छ्वासोऽनिवत्सरः ।
याप्यस्तु हर्षो भेदश्च शेषान् शस्त्रौषधैर्जयेत् ।।[२१]

त्यात कराल, मांसोष्ठपाक, रक्तौष्ठपाक, जलार्बुदावाचून इतर अर्बुदे, कच्छप, तालुपिटिका, गलौघ, महासुषिर, स्वरघ्न, ऊर्ध्वगद, श्यावदन्त, शतघ्नी, वलय, अलस, त्रिदोषात्मक, नाडीव्रण, ओष्ठकोप, रक्तजन्य व त्रिदोषात्मक रोहिणी, दांत फुटला असताना दन्तभेद, पक्व झालेली उपजिह्वा, स्वरभ्रंश व कृच्छ्रोच्छ्वास ही लक्षणे असून वर्षापलिकडील गलगंड हे रोग असाध्य, दन्तहर्ष व दन्तभेद हे रोग याप्य व बाकीचे रोग शस्त्र व औषधी यांनी बरे होतात.

ज्याप्रमाणे वाग्भटाने मुखरोगांचे वर्णन केलेले आहे, त्याचप्रमाणे शारङ्गधर संहितेमध्ये लहान बालकांच्या दातांसंबंधी वीस प्रकारच्या रोगांची चर्चा केलेली आहे. या रोगांची नावे या संहितेमध्ये पुढीलप्रमाणे दिली आहेत.

द्वाविंशतिर्बालरोगास्तेषुक्षीरभवास्त्रयः ।
वातापित्तात्कफाचैव दन्तोद्भेदश्चतुर्थकः ।।
दन्ताघातो दन्तशब्दोऽकाल दन्तोऽहिपूतनः ।
मुखपाको मुखस्रावो गुदपाकोपशीर्षके ।।
पश्चारूणस्यात्तालुकण्ठो विच्छिन्नं पारिगर्भिकः ।
दौर्बल्यं गात्रशोषश्च शय्यामूत्रं कुकूणकः ।
रोदनं चाजगल्ली स्यादिति द्वाविंशतिः स्मृताः ।।[२२]

(१) क्षीरभव म्हणजे दुधामुळे उत्पन्न होणारे तीन प्रकारचे रोग (वात, पित्त, कफ यानुसार) (२) दन्तोद्भेद (३) दन्तघात (४) दन्तशब्द (५) अकालदन्त (६) अहिपूतन (७) मुखपाक (८) मुखस्राव (९) गुदपाक (१०) उपशीर्षक (११) पश्चारूण (१२) तालुकण्टक (१३) विच्छिन्न (१४) पारिगर्भिक (१५) दौर्बल्य (१६) गात्रशोष (१७) शैय्यामूत्र (१८) कुकूणक (१९) रोदन (२०) अजगल्लिका.

अशाप्रकारे लहान बालकांच्या दातांसंबंधीचे एकंदर २० रोग शारङ्गधर संहितेमध्ये निर्देशिले आहेत. वर्धन हा आजार शेवटच्या हनु दाताच्या उद्भवाच्या वेळेस अतीव वेदना होण्याचा असतो. या दाताचे मुखात आगमन झाल्यावर ही वेदना आपोआप थांबते. ह्याच संहितेमध्ये दातांसंबंधी इतर माहिती दिलेली आहे.

## दन्तोत्पत्ति -

तत्रास्थि मज्जानी दन्तोत्पत्तिहेतू तदा च तयोरसम्पूर्ण वीर्यत्वात् पुनः कालान्तरेण दन्तानां पतनामापूर्यमाणधातुत्वाच्च पुनरुत्थान मत एव च वृद्धानां न पुनर्दन्तोत्पत्तिः भक्षयेदन्तपवनं नास्थिर द्विजबन्धनः । तस्य तद्वदनं क्रुद्धः कुर्याद्दन्तामयात् सरुक् ।।[२३]

दांत हे अस्थि व मज्जा यांनी बनलेले असतात. पूर्वदन्त (अस्थायी दांत) दुर्बल असतात व बालकामधील धातु दुर्बल असल्याने हे दांत पडतात. उत्तरदन्त (स्थायी दात) हे कठीण व बलिष्ठ असतात. कारण ते सबळ धातुंनी बनलेले असतात. वृद्धजनांमध्ये धातुदौर्बल्य असल्याकारणाने स्थायी दात एकदा पडल्यास पुन्हा येत नाहीत.

तौत धातुकालक्रमेण पच्यमानौ यदादन्ताशयमनुप्रपद्येते तदास्य किश्चदुत्सेघेनोर्ध्वाधो दन्तमांस सघट्टनादङ्कहर्षोजायते। तद्‌गतेन च श्लेष्मणा कण्डूस्तया चुचूकं दश्यते। यद्यदालभते ततदास्य मानयति। मारुतश्च अस्य दन्तमूलेषु मूर्छति। ततः सकफानुविद्धोऽस्थि मज्जस्थित सर्वतो विसरन् सहपित्तेन धातून् मलांश्च दूषयन् विविधान्यधोदिता नुपद्रवानभिनिर्वर्तयति।[२४]

दन्तोद्भवाच्या वेळी अस्थि व मज्जा हळुहळू वाढतात व दन्ताक्षयापर्यंत पोचतात. जेव्हा अस्थि व मज्जा यापासून दांत पूर्ण तयार होऊन हिरड्यांच्या बाहेर येतात, तेव्हा आतून व बाहेरून दोन्हीकडून मुलांना वेदना होतात. हिरड्यांमधील कफामुळे खाजेची संवेदना होते. अशा वेळी लहान बालक आईच्या स्तनाला व तसेच जी वस्तू मिळेल त्याला चावून हिरड्यांची कंड थांबविण्याचा प्रयत्न करते. दन्तोद्‌भवाच्या वेळेस हिरड्यांमधील वायू, कफ, अस्थि व मज्जा, वात यासह मिळून पूर्ण शरीरात पसरतो व अनेक विकार निर्माण करतो. हिरड्यांमधील वायू स्वतः किंवा पित्ताच्या सहाय्याने अस्थि व मज्जा यांना शुष्क करून दन्तोद्भव थांबवितो.

हनुमूलगतो वायुर्दन्तदेशे ऽ स्थिगोचरः ।
यदा शिशोः प्रकुपितो नेत्तिष्ठन्ति तदा द्विजाः ।।[२५]

हिरड्यांच्या खालील भागात स्थित वायू दातांना पूर्वनियोजित समयाप्रमाणे वाढण्यापासून रोखतो.

दन्तोद्‌भेद रोगासंबंधी या संहितेत निर्देश आहे –

दन्तोद्भेदश्च दीर्घायुषोऽष्टमात् मासात् परतीवा प्रवर्तते। इतरेषान्तुचातुर्थान्ते अतिबाल्ये दन्तोत्पत्ति वेदनया पीडिता न सम्यक् संपूर्णधातुबला भवन्ति। दन्तोद्भेदश्च सर्वरोगायतनं। विशेषेण तु तन्मुला ज्वरशिरोऽ भिताप तृष्णा भ्रमभिष्यन्द कुकूणक पोथकी वमथु कासश्वासातीसार विसर्पाः। पृष्ठभंगे

बिडालांना बर्हिणां च शिखोद्गमे । दन्तोद्भवे च बालानां नहि किञ्चिन्नदूष्यते ।। दन्तोद्भेदश्च रोगाणां सर्वेषामपिकारणम् । विशेषाज्ज्वर विड्भेदकासच्छर्दि शिरोरुजां । अभिष्यन्द्रस्य पोथक्या विसर्पस्य च जायते ।।[२६]

दन्तोद्भवाच्या समयी मुलांना अनेक प्रकारचे विकार होतात व या विकारांबरोबरच ताप, अतिसार, खोकला, वमन, शिरशूल, नेत्ररोग अशाप्रकारच्या तक्रारी दिसतात. त्याचप्रमाणे या वेळेस तृष्णा, भ्रम, दमा, ग्रहणी, आदि होऊ शकतात.

**सदन्तजन्म –**

सदन्तोजायते यस्तु दन्ताः प्रागस्य चोत्तराः ।
कुर्वीत तस्मिन्नुत्पाते शान्तिकं च द्विजातये ।
दद्यात्सदक्षिणं बालं नैगमेषं च पूजयेत् ।।[२७]

मूल जर सदन्त जन्मले किंवा वरच्या जबड्यातील दांत जर प्रथम आले तर ते अनिष्ट मानतात. अशा वेळेस शान्ति करून नैगमेष ग्रहाची पूजा करावी.

**दन्तपतन –**

यावन्मासस्य योजातस्तावद् वर्षस्य सद्विजः ।
पतति प्रायशोऽष्टानां तेषां पूर्वेषु संभवः ।।[२८]

दांत पडण्याच्या वेळेस अस्थायी दात पडून स्थायी दांत येतात. अपघाताने देखील दन्तपतन होऊ शकते.

**दन्तशब्द –**

रूक्षाशिनो वातिकस्य चालयत्यनिलः शिराः ।
हन्वाश्रया प्रसुप्तस्य दन्तैः शब्दं करोत्यतः ।।[२९]

वात प्रकृतीच्या बालकामध्ये वातामुळे जबड्याच्या शिरा हालतात व झोपेमध्ये मूल दांत घासत आवाज करते. यालाच दन्तशब्द असे म्हणतात.

**अकालदन्त -**

ताप आदि विकास उद्‌भवल्यामुळे दुधाचे दांत असमयी पडतात व त्या जागी नवे दांत येतात त्याला अकालदन्त म्हणतात.

सुश्रुतसंहितेत नमूद केलले आहे की भगवान धन्वन्तरि यांनी स्वतः सुश्रुताला सांगितल्याप्रमाणे मुख रोग एकंदर ६५ असतात व ते सात स्थानी उत्पन्न होतात. ही सात स्थाने पुढीलप्रमाणे – दोन ओष्ठ, दन्तमूल, जिह्वा, तालु, दन्त, कण्ठ, मुख.

यथोवाच भगवान् धन्वन्तरिः ।।

मुखरोगाः पञ्चषष्टिः स्पतस्वायतनेषु। तत्रायतनानि – ओष्ठौ, दन्तमूलानि, दन्ताः, जिह्वा, तालु, कण्ठ, सर्वाणि चेति.[३०]

सुश्रुताने दन्तगत रोग आठ मानले आहेत. दन्तागतास्तु – दालनः, क्रिमिदन्तको, दन्तहर्षो, भञ्जनकः, शर्करा, कपालिका, श्यावदन्तको, हनुमोक्षश्चेति. [३१]

दन्तगत रोग – दालन, क्रिमिदन्त, दन्तहर्ष, भञ्जनक, शर्करा, कपालिका, श्यावदन्तक व हनुमोक्ष असे आठ आहेत.

दाल्यन्ते बहुधा दन्ता यस्मिंस्तीव्ररूगान्विताः ।
दालनः स इति ज्ञेयः सदागतिनिमित्तजः ।। [३२]

ज्यामधे दांत अनेक प्रकारे फाटतात, तीव्र वेदना होतात, असा सदागति (वात) निमित्ताने होणारा 'दालन' नामक विकार आहे.

कृष्णच्छिद्री चलः स्रावी ससंरम्भो महारूजः ।
अनिमित्तरूजो वाताद्विज्ञेयः कृमिदन्तकः ।। [३३]

वाताच्या कारणाने जो दांत प्रथम काळा होतो, मग त्यात छिद्र होते, मग तो हलू लागतो, त्यामधून स्राव निघतो, विनाकारणच कधी कधी ज्यामध्ये अतीव पीडा होते त्या विकारास कृमिदन्तक म्हणतात.

दशना: शीतमुष्णं च सहन्ते स्पर्शनं न च ।
यस्य तं दन्तहर्षं तु व्याधि विद्यात् समीरणात् ।।[३४]

ज्यावेळेस दांत शीत, उष्ण किंवा केवळ स्पर्शदेखील सहन करू शकत नाहीत, तेव्हा दाताला वातजन्य दन्तहर्ष नामक विकार आहे असे मानावे.

वक्त्रं वक्रं भवेद्यस्मिन् दन्तभङ्गश्च तीव्ररूक् ।
कफवातकृतो व्याधि: स भञ्जनकसंज्ञित: ।।[३५]

ज्या विकारात मुख तिरपे होते, तथा दाताचा भंग होतो, तीव्र पीडा होते, त्या विकाराला कफवातजन्य भञ्जनक मानावे.

शर्करेव स्थिरीभूतो मलो दन्तेषु यस्य वै ।
सा दन्तानां गुणघ्नी तु विज्ञेया दन्तशर्करा ।।[३६]

जेव्हा दातांवर शर्करा – रेतीसमान मल जमा होतो व त्याकारणाने दातांची दृढता व शुभ्रत: हे गुण नष्ट होतात, तेव्हा शर्करा व्याधी मानली जाते.

दलन्ति दन्तवल्कानि यदा शर्करया सह ।
ज्ञेया कपालिका सैव दशनानां विनाशिनी ।।[३७]

दातांवर जमलेल्या शर्करेमुळे त्या शर्करेबरोबर दन्तवल्क – दन्तकवच उतरू लागते तेव्हा दन्तनाशिनी कपालिका हा विकार होतो.

योऽसृङ्मिश्रेण पित्तेन दग्धो दनप्तस्त्वशेषत: ।
श्यावतां नीलतां वा ऽ पि गत: स श्यावदन्तक: ।। [३८]

जे दांत रक्त तथा पित्त यांच्या प्रकोपाने पूर्ण रूपाने अशेष (दग्ध) होऊन श्याव (मळकट) किंवा निळसर होतात, ते दांत श्यावदन्तक रोगाने पीडित मानावे.

वातेन तैस्तैर्भावैस्तु हनुसन्धिर्विसंहतः ।

हनुमोक्ष इति ज्ञेयो व्याधिरर्दितलक्षणः ।। [३९]

उच्चभाषण, हसन, जृम्भण आदि भिन्न भिन्न भावांच्या कारणाने कुपित झालेल्या वातामुळे हनुसंधि विसंहत (स्वस्थानभ्रष्ट) होते. तसेच या विकारात अर्दित (Paralysis) सारखे मुखलक्षण होते. हा हनुमोक्ष विकार (Dislocation of jaw) आहे.

श्रीमाधवविरचित **'माधवनिदानम्'** या ग्रंथामधे मुखरोग उत्पन्न होण्याची सामान्य कारणे सांगितलेली आहेत.

आनूपपिशितक्षीरदधिमत्स्यातिसेवनात् ।

मुखमध्ये गदान् कुर्युः क्रुद्धा दोषः कफोत्तरा ।। [४०]

आनूपमांस, दुध, दही व मासे यांच्या अतिसेवनामुळे कुपित झालेले कफप्रधान दोष मुखामधे रोग उत्पन्न करतात.

माधवनिदानानुसार दन्तगत रोग आठ आहेत.

दीर्यमाणेष्विव रूजा यस्य दन्तेषु जायते ।

दालनो नाम स व्यापिः सदागतिनिमित्तजः ।। [४१]

ज्या विकारात दातामधे फाडण्यासमान पीडा होते तया वातज विकाराला 'दालन' म्हणतात. अष्टांग हृदयकार याच रोगाला 'शीतदंत' म्हणतात.

कृष्णच्छिद्रश्चलः स्रावी संसरम्भो महारूजः ।

अनिमित्तरूजो वाताद्विज्ञेयः क्रिमिदन्तकः ।। [४२]

जे दांत काळे व सच्छिद्र असतात, जागेवर हलतात, ज्यामधून स्राव निघतो, शोथ व विनाकारण वेदना होतात त्या वातनिमित्ताने होणाऱ्या विकारास 'क्रिमिदन्तक' असे म्हणतात.

वक्त्रं वक्रं भवेद्यस्य दन्तभङ्गश्च जायते ।

कफवातकृतो व्याधिः स भञ्जनकसंज्ञितः ।। [४३]

ज्या व्याधिमुळे मुख वाकडे होते व दांत तुटतात त्या व्याधिला 'भञ्जनक' असे नांव आहे

शीतरूक्षप्रवाताम्लस्पर्शानामसहा द्विजा: ।

पित्तमारुतकोपेन दन्तहर्ष: स नामत: ।। [४४]

पित्त व वायू यांच्या प्रकोपाने दांत शीत, रूक्ष पदार्थ, वायु, अम्ल पदार्थ यांना सहन करू शकत नाही. हा 'दन्तहर्ष' नामक विकार आहे.

मलो दन्तगतो यस्तु पित्तमारूतशोषित: ।

शर्करेव खरस्पर्शा सा ज्ञेया दन्तशर्करा ।। [४५]

दातांचा मळ खरखरीत स्पर्शाचा व कडक होतो. असा पित्त व वायु याच्यामुळे शोषित झाल्यामुळे होणारा विकार तो 'दन्तशर्करा'.

कपालेष्विव दीर्यत्सु दन्तानां सैव शर्करा ।

कपालिकेति विज्ञेया सदा दन्तविनाशिनी ।। [४६]

कपालाप्रमाणे कठीण, मलयुक्त दातांच्या तुकड्यांना विदीर्ण करीत निघणारी, दातांचा नाश करणारी, वर वर्णिलेली दन्तशर्करा 'कपालिका' या नावाने ओळखली जाते.

योऽसृङ्मिश्रेण पित्तेन दग्धो दन्तस्त्वशेषत: ।

श्यावतां नीलतां वापि गत: स श्यावदन्तक: ।। [४७]

जो दांत रक्तमिश्रित पित्तामुळे पूर्णपणे दग्ध व लिप्त होऊन काळा वा निळा पडतो तो दांत श्यावदन्तक व्याधिने ग्रस्त असतो.

दन्तमांसे मलै: सास्रैर्बाह्यान्त: श्वयथुर्गुरु: ।

सदाहरूक् स्रवेद्भिन्न: पूयास्रं दन्तविद्रधि: ।। [४८]

हिरड्यांमध्ये रक्तासहित वातादि दोषांमुळे आत व बाहेर अतिशय जळजळ व पीडा होते व ज्याच्या विदीर्ण झाल्यावर रक्तमिश्रित पूचा स्राव होतो, त्या व्याधिला 'दन्तविद्रधि' असे म्हणतात.

वाग्भट, सुश्रूत, शारङ्गधर यांनी दन्तरोगांची लक्षणे व नांवे स्पष्टपणे व विस्तृतपणे सांगितली आहेत. यामध्ये काही काही ठिकाणी किंचित् फरक आहे. उदाहरणार्थ वाग्भटाने तराल व वर्धन यांना दंतरोगांमध्ये घेतले आहे व दन्तविद्रधी नामक रोग दन्तमूलगत रोगांमध्ये घेतला आहे. माधवाने यांचा संग्रह दंतरोगामध्ये केला आहे.

केवळ दंतविषयक रोगांचे इतक्या विस्ताराने वर्णन आयुर्वेदिय ग्रंथांमध्ये उपलब्ध आहे. यावरून प्राचीन काळातील प्रगत वैद्यक शास्त्राचा आवाका लक्षात येतो. हे रोग समाजामध्ये कितपत प्रमाणात पसरलेले होते याविषयी माहिती मिळत नाही. परंतु दातांची सर्व प्रकारची सूक्ष्म परीक्षा प्राचीन काळात देखील केली जात होती हे या वर्णनावरून स्पष्ट होते.

*****

# संदर्भसूची


१. सा. वा. अ. २१ /११
२. सा. वा. अ. २१ /१२
३. सा. वा. अ. २१ /१३
४. सा. वा. अ. २१ /१४
५. सा. वा. अ. २१ /१४
६. सा. वा. अ. २१ /१५
७. सा. वा. अ. २१ /१६
८. सा. वा. अ. २१ /१७
९. सा. वा. अ. २१ /१७
१०. सा. वा. अ. २१ /१८,१९
११. सा. वा. अ. २१ /२०
१२. सा. वा. अ. २१ /२१,२२
१३. सा. वा. अ. २१ /२३
१४. सा. वा. अ. २१ /२४
१५. सा. वा. अ. २१ /२५
१६. सा. वा. अ. २१ /२६
१७. सा. वा. अ. २१ /२७
१८. सा. वा. अ. २१ /२८
१९. सा. वा. अ. २१ /२९,३०
२०. सा. वा. अ. २१ /६४,६५
२१. सा. वा. अ. २१ /६६-६९
२२. शा. सं. अ. ७/१८६-१८८
२३. अं. सं. उ.अ. २
२४. तदेव
२५. तदेव
२६. तदेव
२७. तदेव
२८. तदेव
२९. तदेव
३०. सु. सं. अ. १६/३
३१. सु. सं. अ. १६/२८
३२. सु. सं. अ. १६/३०
३३. सु. सं. अ. १६/३१
३४. सु. सं. अ. १६/ ३२
३५. सु. सं. अ. १६/३३
३६. सु. सं. अ. १६/२४
३७. सु. सं. अ. १६/३५
३८. सु. सं. अ. १६/ ३६
३९. सु. सं. अ. १६/३७
४०. मा. नि. अ. ५६/१
४१. मा. नि. अ. ५६/२२
४२. मा. नि. अ. ५६/२३
४३. मा. नि. अ. ५६/२४
४४. मा. नि. अ. ५६/२५
४५. मा. नि. अ. ५६/२६
४६. मा. नि. अ. ५६/२७
४७. मा. नि. अ. ५६/२८
४८. मा. नि. अ. ५६/२९


*****

# प्रकरण - ४
# दन्तरोगचिकित्सा

'स्वस्थस्य स्वास्थ्य रक्षणम्' हा आयुर्वेदाचा मूलमंत्र असल्याकारणाने बहुतांश आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये रोगप्रतिबंधक उपाय सांगितलेले आहेत. एकदा विकार उद्भवला की त्या विकाराच्या शमनासाठी विविध उपचार देखील सांगितलेले आहेत.

दन्तोद्भेदाच्या समयी बालकांमध्ये जे विकार दिसतात ते मुख्यत्वे ज्वर, वमन व अतिसार या रूपात असतात. कधी कधी खोकला होतो. तसेच लालास्रावाचे प्रमाण वाढते. मुलिंझार्रीनझा हिरड्यांना आत्यन्तिक खाज येऊ शकते. हिरड्या लाल होणे, सूजणे, वेदना होणे, दिसेल त्या वस्तुला चावण्याची प्रबळ इच्छा होणे ही सर्व दन्तोद्भेदाची पूर्वरूपे आहेत.

या विकारांसाठी स्पष्ट निर्देश आहेत -

दन्तोद्भेदेषु रोगेषु न बालमतियन्त्रयेत् ।

स्वयमेवोपवशाम्यति जातदन्तस्य ये गदा: । [१]

अर्थात दांत येण्याची समयीचे उपद्रव जर विशेष प्रबळ रूपात नसले तर विशेष उपक्रमाची आवश्यकता नाही. दांत उगवल्यावर हे उपद्रव स्वत:च शांत होतात.

आयुर्वेदीय ग्रंथांमधील बृहत्रयी म्हणजे वाग्भट, सुश्रुत व चरकसंहिता आणि लघुत्रयी म्हणजे शारङ्गधर संहिता, माधवनिदान, भावप्रकाश तसेच इतर भेलसंहिता, हारितसंहिता इत्यादी ग्रंथांमध्ये दन्तरोग एकंदर आठ ते दहा सांगितले आहेत ते पुढीलप्रमाणे -

(१) दालन (२) कृमिदन्तक (३) दन्तहर्ष (४) भञ्जनक (५) शर्करा (६) कपालिका (७) शावदन्तक (८) हनुमोक्ष.

शारङ्गधराने (९) कराल व (१०) दन्तचाल हे दोन रोग अधिक मानले आहेत.

वाग्भट देखील अपनिविष्ट १० दंतरोग मानतात. सुश्रुताने लिहिलेल्या 'हनुमोक्ष' या विकाराला वाग्भट 'दंतविद्रधि' असे नाव देतात. मुखामध्ये उद्भवलेल्या मुखरोगांचे 'वर्गीकरण' माधवनिदान या ग्रंथामध्ये पुढीलप्रमाणे केलेले आहे.

| | रोग | सुश्रुत | वाग्भट | भोज |
|---|---|---|---|---|
| (१) | ओष्ठरोग | ०८ | १२ (१ गण्डगत) | ०८ |
| (२) | दंतरोग | ०८ | १० | ०८ |
| (३) | दंतमूलरोग | १५ | १३ | १५ |
| (४) | जिह्वारोग | ०५ | ०६ | ०५ |
| (५) | तालुरोग | ०९ | ०८ | ०९ |
| (६) | कण्ठरोग | १७ | १८ | १७ |
| (७) | सर्वसररोग | ०३ | ०८ | ०३ |
| | | ६५ | ७५ | ६५ |

रोगगणत्वसामान्यान्मुखरोगनिदानमुच्यते – आनुपेत्यादि। मुखरोगाश्च पञ्चषष्टिर्भवन्ति। यदाह भोज – दन्तवेष्टावोष्ठयोश्च मूलेषु दश पञ्च च। नव तालुनि जिह्वायां पञ्चसप्तदशाहामयाः। कण्ठे त्रयः सर्वसरा पञ्चषष्टिचतुःपरा इति ॥ [१]

या मुखरोगांचे प्रमुख कारण कफदोष सांगितला गेला आहे. परंतु प्रधानरूपाने कफ प्रकोपामुळे होणारे हे रोग रस – वीर्य – विपाक प्रभाव आदिद्वारा पित्त व वायू यांच्या प्रकोपाला पण कारणीभूत होतात व रोगाच्या अभिव्यक्तिच्या समयात कफ – पित्त – वात यापैकी कोणा एकाचा किंवा इतरांचा प्रभाव असेल त्याप्रमाणे लक्षणे दिसतात व त्या लक्षणांच्या अनुसार त्या विकारांचे 'वातिक' आदी नामकरण होते.

आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये सांगितलेल्या मुखरोगांवरील उपचार विविध प्रकारचे आहेत. दन्तजन्य विकारांवर सांगितलेले उपचार मुख्यत्वे करून (१) गण्डूष (२) कवल (३) चूर्ण अशा प्रकारचे आहेत. तसेच कांही प्रसंगी शस्त्रक्रिया देखील सांगितलेली आहे. गण्डूष व कवल यातील भेद पुढीलप्रमाणे सांगितला आहे -

चतुर्विधःस्याद्गण्डूषः स्नैहिक शमनस्तथा ।

शोधनो रोपणश्चैव कवलश्चापि तद्विधः ॥

गण्डूष (Mouth Gargle) चार प्रकारचे असतात.

(१) स्नैहिक Olealing

(२) शमन Palliative

(३) शोधन Purification

(४) रोपण Healing

कवल देखील चार प्रकारचे असतात.

(१) स्नेही

(२) प्रसाद

(३) शोधन

(४) रोपण

स्निग्धोष्णैः स्नैहिको वाते स्वादुशीतैः प्रसादनः ।

पित्ते कट्वम्ललवणोष्णैः संशोधनः कफे ॥

कषायतिक्तमधुरैः कटुष्णो रोपणो व्रणे

चतुष्प्रकारो गण्डूषः कवलश्चापि कीर्तितः ॥[४]

वात विकार शान्तिकरिता स्नैहिक गण्डूष स्निग्ध द्रव्यांसह दिले जाते.

पित्त विकार शान्तिकरिता शमन गण्डूष गोड व थंड द्रव्यासह दिले जाते.

कफ विकारशान्तिकरिता शोधन गण्डूष कटु, आम्ल, लवण व उष्ण द्रव्यांसह दिले जाते.

### गण्डूषादीचा हीनअतियोग -

हीनयोगात्कफोत्क्लेशो रसज्ञानारूची तथा ।

अतियोगान्मुखे पाक: शोषस्तृष्णा क्लमो भवेत् ।।[८]

गण्डूष, कवल किंवा प्रतिसारण यांचा हीन म्हणजे आवश्यकतेपेक्षा कमी प्रयोग झाल्यास मुखातील कफाचा उत्क्लेश (Profuse salivation) , रसांचे यथार्थ ज्ञान न होणे (Loss of perception of taste) व अरूचि (Anorexia) होते. परंतु यांचाच अति म्हणजे आवश्यकतेपेक्षा जास्त प्रयोग झाल्यास तोंड येणे (Stomatitis),मुखशोष (Dryness of mouth), तहान (Thirst) व क्लम (exertion) होते.

### गण्डूष शुद्धिचे लक्षण -

व्याधेरपचयस्तुष्टिर्वैशद्यं वक्त्रलाघवम् ।

इन्द्रियाणां प्रसादश्च गण्डूषे शुद्धिलक्षणम् ।।[९]

रोगाचा अपचय होणे, संतुष्टि होणे, मुख स्वच्छ व हलके वाटणे, इन्द्रिय प्रसन्न वाटणे ही सर्व गण्डूषाद्वारे मुखशुद्धी झाल्याची लक्षणे आहेत.

'भैषज्यरत्नावली' या ग्रंथामध्ये 'मुखरोगचिकित्साप्रकरणम्' या शीर्षकाखाली ओष्ठादि मुखाच्या अवयवांच्या रोगचिकित्सा स्पष्ट केलेल्या आहेत. यापैकी 'दन्तरोगचिकित्सा' या शीर्षकान्तर्गत दन्तरोगावरील उपचार विस्तारपूर्वक लिहिले आहेत. हे उपचार पुढीलप्रमाणे आहेत.

### शीताद रोग -

शीतादे हृतरक्ते तु तोये नागरसर्षपान् ।

निक्वाथ्य त्रिफलाश्चापि कुर्याद् गण्डूषधारणम् ।

प्रियङ्गवश्च मुस्ता च त्रिफला च प्रलेपनम् ।।[१०]

शीताद नामक दन्तरोगामध्ये रक्तमोक्षण करून सुंठ, सरस व त्रिफळाच्या क्काथाने (काढा) गण्डूष धारण करावा. प्रियङ्गु, नागरमोथा व त्रिफळा यांचा लेप लावल्यास हा रोग नष्ट होतो.

**रक्तस्राव, खाज व वेदना -**

कुष्ठं दार्वी लोध्रमद्वं समङ्गा तिक्तां पाठा तेजनी पीतिका च ।

चूर्णं शस्तं घर्षणं तद् द्विजानां रक्तस्रावं हन्ति कण्डूं रूजाश्च ।।[११]

दारूहळद, आवळा, लोध्र, मोथा, मंजीष्ठा, कुटकी, पाठा, तेजबल, हरिद्रा यांच्या चुर्णाने मंजन केल्यास दातांमधून (हिरड्यांमधून) होणारा रक्तस्राव, खाज व वेदना दूर होतात.

**चलदन्त - दांत हलणे -**

चलदन्तस्थिकरं कार्यं बकुलचर्वणम् ।

आर्त्तगलदलक्काथगण्डूषो दन्तचालनुत् ।

दन्तचाले हितं श्रेष्ठं तिलोग्राचर्वणं सदा. ।।[१२]

मौलिश्रीच्या सालीचे चर्वण करत राहिल्यास हलणारे दांत दृढ होतात. अशाच प्रकारे नीलझिन्टीच्या पानांचा काढा करून त्याचा गण्डूष ठेवल्यास तसेच काळे तीळ व वचा चावत राहिल्यास 'चलदन्त' नामक रोग नष्ट होतो.

**दन्तधावन -**

करञ्जकरवीरार्कमालतीककुभासनाः ।

शस्यन्ते दन्तपवने ये चाप्येवंविधा द्रुमाः ।।[१३]

करंज, कण्हेर, आर्क (मंदार), मालती, अर्जुन व असन वृक्षा, तसेच यांच्या समान गुणधर्म असणारे इतर वृक्षा दन्तधावनाकरिता योग्य आहेत.

### भद्रमुस्तादिगुटिका -

भद्रमुस्ताभयाव्योषविडङ्गारिष्टपल्लवैः ।
गोमूत्रपिष्टैर्गुडिकां छायाशुष्कां प्रकल्पयेत् ।।
तां विधाय मुखे सुप्याच्चलदन्तातुरो नरः ।
नातः परतरं किञ्चिच्चलदन्तस्य भेषजम् ।।[१४]

नागमोथा, हिरडा, सुंठ,मरिच, पिप्पली, वायविडंग व लिंबाच्या पानांना गोमूत्रासह बारिक वाटून छाया शुष्क गोळ्या बनवाव्यात. रात्री झोपतेवेळी एक गोळी तोंडात ठेवावी. काही दिवसांमधे या गुटिकेच्या प्रभावाने दात हालणे बंद होते.

### दन्तपुप्पुट रोग -

दन्तपुप्पुटके कार्यं तरूणे रक्तमोक्षणम् ।
सपञ्चलवणक्षारं सक्षौद्रं प्रतिसारणम् ।।[१५]

नवीन दन्तपुप्पुट रोगांत रक्तमोक्षण केल्यानंतर पंचलवण (मीठ) तथा यवक्षार चे श्लचण चूर्ण व मध एकत्र करून त्याचे प्रतिसारण करावे.

### दन्ततोद व दन्तहर्ष -

दन्तानां तोदहर्षे च वाताघ्नाः कवलाहिताः ।।[१६]

दन्ततोद व दन्तहर्ष नामक रोगांमध्ये वातनाशक उष्ण तैल एवं घृत (तूप) अथवा दशमूलादि वातघ्न काढ्याचा गण्डूष धारण करावा.

### दन्तशूल -

माक्षिकं पिप्पली सर्पिमिश्रितं धारयेन्मुखे ।
दन्तशूलहरं प्रोक्तंप्रधानमिदमौषधम् ।।[१७]

मध, पिप्पली चूर्ण व तूप यांचे मिश्रण मुखात धारण केल्याने किंवा या चूर्णाने घर्षण केल्याने दंतशूल नष्ट होतो. दंतशूलाचे हे प्रमुख औषध आहे.

**दन्तवेष्ट –**

विस्राविते दन्तवेष्टं व्रणन्तु प्रतिसारयेत् ।

लोध्रपत्तङ्गमधुकलाक्षाचूर्णैर्मधूत्तरैः ।

गण्डूषे क्षीरिणी योज्याः सक्षौद्रघृतशर्कराः ।।[१८]

दन्तवेष्ट रोगात अशुद्ध रक्ताचे मोक्षण करून त्या स्थानावर (व्रणावर) लोध्र, लाल चन्दन, मुलेठी व लाक्षा यांचे चूर्ण मधामधे मिसळून घर्षण करावे अथवा वटादि क्षीरिवृक्षाच्या काढ्यामध्ये मध, तूप व साखर मिसळून गण्डूष धारण करावा.

**शैशिर दन्तरोग –**

शैशिरे हृतरक्तं तु लोध्रमुस्तारसाञ्जनैः ।

सक्षौद्रे शस्यते लेपो गण्डूषे क्षीरिणो हिताः ।।[१९]

शैशिर दन्तरोगामध्ये रक्तनिर्हरण केल्यानंतर लोध्र, नागरमोथा व रसाञ्जन यांच्या चूर्णामध्ये मध मिसळून लेप करावा तथा क्षीरिवृक्षांच्या काढ्याच गण्डूष धारण करावा.

**परिदर रोग व उपकुश रोग –**

क्रियां परिदरे कुर्याच्छीतादोक्तां विचक्षणः ।

संशोध्योभयतः कायं शिरश्चोपकुशे ततः ।।

काकोदुम्बरिकागोजीपत्रैर्विस्रावयेदसृक् ।

क्षौद्रयुक्तैश्च लवणैः सव्योषैः प्रतिसारयेत् ।।[२०]

परिदर रोगामध्ये वमन व विरेचनाद्वारे कायशुद्धी तथा नस्य द्वारे शिरोविरेचन करून शीताद रोगासाठी सांगितलेली संपूर्ण क्रिया करावी.

याचप्रमाणे उपकुश रोगामध्ये वमन विरेचन आदि करून कठगूलर किंवा कठूमर तसेच गोजी आदिंच्या कर्कशपानांनी घर्षण करून अशुद्ध रक्ताचे स्रवण होऊ द्यावे व त्रिकटु तसेच पाचही प्रकारच्या मीठाचे चूर्ण एकत्र करून त्यात मध मिसळून प्रतिसारण करावे.

**उपकुश रोग-**

पिप्पल्या: सर्षपा: श्वेता नागरं नैचुलं फलम् ।
सुखोदकेन सम्मर्द्य कवडन्तस्य योजयेत् ।।[२१]

पिप्पली, श्वेत सरसो, सुंठ, हिज्जल फळाचे चूर्ण कोमट पाण्यात घालून चुरून कवल धारण केल्याने उपकुश रोग बरा होतो.

**दन्तवैदर्भ रोग-**

शस्त्रेण दन्तवैदर्भे दन्तमूलानि शोधयेत् ।
तत: क्षारं प्रयुञ्जीत क्रिया: सर्वाश्च शीतला: ।।[२२]

दन्तवैदर्भरोगात शस्त्राद्वारे दाताच्या मूळामधील दूषित मास कापून तिथे क्षाराचे प्रतिसाराण करावे. त्यानंतर गण्डूषधारणाची शीतक्रिया करावी.

**अधिकदन्त -**

उद्धृत्याधिकदन्तन्तु ततोऽग्निमवचारयेत् ।
कृमिदन्तकवच्चात्र विधि: कार्यो विजानता ।।[२३]

अधिक दन्ताला सन्दंश यंत्राद्वारे काढून रक्तस्रुति निवारणासाठी तप्तशलाकेने दाह करावा तसेच दन्तोक्त कृमिचिकित्सा करावी.

परिदर रोगामध्ये वमन व विरेचनाद्वारे कायशुद्धी तथा नस्य द्वारे शिरोविरेचन करून शीताद रोगासाठी सांगितलेली संपूर्ण क्रिया करावी.

याचप्रमाणे उपकुश रोगामध्ये वमन विरेचन आदि करून कठगूलर किंवा कठूमर तसेच गोजी आदिंच्या कर्कशपानांनी घर्षण करून अशुद्ध रक्ताचे स्रवण होऊ द्यावे व त्रिकटु तसेच पाचही प्रकारच्या मीठाचे चूर्ण एकत्र करून त्यात मध मिसळून प्रतिसारण करावे.

**उपकुश रोग-**

पिप्पल्याः सर्षपाः श्वेता नागरं नैचुलं फलम् ।
सुखोदकेन सम्मर्द्य कवडन्तस्य योजयेत् ।।[२१]

पिप्पली, श्वेत सरसो, सुंठ, हिज्जल फळाचे चूर्ण कोमट पाण्यात घालून चुरून कवल धारण केल्याने उपकुश रोग बरा होतो.

**दन्तवैदर्भ रोग-**

शस्त्रेण दन्तवैदर्भे दन्तमूलानि शोधयेत् ।
ततः क्षारं प्रयुञ्जीत क्रियाः सर्वाश्च शीतलाः ।।[२२]

दन्तवैदर्भरोगात शस्त्राद्वारे दाताच्या मूळामधील दूषित मास कापून तिथे क्षाराचे प्रतिसाराण करावे. त्यानंतर गण्डूषधारणाची शीतक्रिया करावी.

**अधिकदन्त -**

उद्धृत्याधिकदन्तन्तु ततोऽग्निमवचारयेत् ।
कृमिदन्तकवच्चात्र विधिः कार्यो विजानता ।।[२३]

अधिक दन्ताला सन्दंश यंत्राद्वारे काढून रक्तस्रुति निवारणासाठी तासशलाकेने दाह करावा तसेच दन्तोक्त कृमिचिकित्सा करावी.

**अधिमांसरोग** -

छित्त्वाऽधिमांसं सक्षौद्रैरेतैश्चूर्णैरुपाचरेत्।
पाठावचातेजवतीस्वर्जिकायावशूकजैः
क्षौद्रद्वितीयाः पिप्पल्यः कवलश्चात्र कीर्तितः ।।[२४]

अधिमांस रोगात मांस कापून पाठा, वचा, तेजबल, स्वर्जिक्षार, यवक्षार यांचे चूर्ण मधात मिसळून त्याने घर्षण करावे तसेच पिप्पलीच्या काढ्यामध्ये मध मिसळून कवल धारण करावा.

पटोलनिम्बत्रिफलाकषायश्चात्र धावने।
शिरोविरेकश्च हितो धूमो वैरेचनश्च यः ।।[२५]

पटोलपत्र, लिंबाची साल, त्रिफळाचा काढा हे सर्व एकवेळ दन्तधावनाकरिता वापरून त्यानंतर शिरोविरेचन व वैरेचनिक धूमपान केल्यास अधिमांस रोगात फायदा होतो.

**दन्तनाडीरोग** -

नाडीव्रणहरं कर्म दन्तनाडीषु कारयेत्।
यं दन्तमधिजायेत तं दन्तमुद्धरेत् ।।
छित्त्वा मांसानि शस्त्रेण यदि नोपरिजो भवेत्।
शोधयित्वा दहेच्चापि क्षारेण ज्वलनेन वा ।।[२६]

दन्तनाडी रोगामध्ये नाडीव्रणोक्त समस्त चिकित्सा करून ज्या दातात नाडी रोग झाला आहे त्या दाताच्या आवरक मांसाला शस्त्राने कापून तो दांत काढून टाकावा. त्यानंतर शोधन करून क्षार किंवा अग्नि यांनी त्या स्थानाला दग्ध करावे. ही क्रिया वरच्या जबड्यातील दासाठी निषिद्ध मानली आहे.

गतिर्हिनस्ति हन्वस्थि दशने समपेक्षिते।
तस्मात्समूलं दशनं निर्हरेद् भग्नमस्थि च ।।[२७]

दन्तनाडी रोगामध्ये दात न काढल्यास दोषाची गती वाढून हन्वस्थिला देखील नष्ट करते. या कारणाने दृढमूल असलेल्या पण दन्तनाडी रोगग्रस्त दाताला मूळासहित काढून टाकणे इष्ट आहे. जर हन्वस्थि खराब झाली असली तर ती देखील काढून टाकावी. या ग्रंथात वरच्या जबड्यातील दात काढण्यास मनाई करण्यात आलेली आहे.

उद्धृतेतूत्तरे दन्ते शोणितं सम्पसिच्यते।
रक्तातियोगात् पूर्वोक्ता घोरा रोगा भवन्ति च।
चलमप्युत्तरं दन्तमतो नापहरेद्भिषक् ।।[२८]

ऊर्ध्वपंक्तितील दात काढल्यावर अधिक रक्तस्राव होतो व त्यामुळे शिरोऽभिताप, आक्षेप, काण, आर्दित आदि भयंकर रोग होतात व म्हणूनऊर्ध्वपंक्तितील दात हालत असले तरी काढू नये.

**दन्तनाडीशोधन –**

कषायं जातिमदनकटुकस्वादुकण्टकैः
लोध्रखदिरमञ्जिष्ठायष्ट्याह्वैश्चापि यत्कृतम्।
तैलं संशोधनं तद्धि हन्यादन्तर्गतां गतिम् ।।[२९]

चमेलीची पाने, मदनफल, कटकी किंवा सुंठ, मरिच, पिप्पली व गोखरू यांचा काढा बनवून मुखधावन (प्रक्षालन) करावे. तसेच लोध्र, खरिरसाल, मजीठ व मुलेठीच्या कलकाने सिद्ध केलेल्या तेलाने दन्तनाडीला प्रतिसारण केल्यास शोधन होऊन दन्तनाडीरोग नष्ट होतो. तसेच चमेली पत्रादिचा काढा ४ शेर, लोध खदिरसाल, मजीठ, मुलेठी यांचा कल्क १ पाव, तीळाचे १ शेर घेऊन यथाविधी तेल सिद्ध करावे. या तेलाने दन्तनाडीचे शोधन केल्यास अस्थिच्या आतपर्यंत गेलेल्या दन्तनाडीरोगाचा उपचार होतो.

दन्तहर्ष -

सुखोष्णाः स्नेहकवलाः सर्पिषस्त्रैवृतस्य वा।

निर्यूहाश्चानिलघ्नानां दन्तहर्षप्रमर्दनाः ।।

स्नैहिकश्च हितो धूमो नस्यं स्नैहिकमेव च ।।[३०]

दन्तहर्ष रोगात मन्दोष्ण तूप, तेल, आदि स्नेहांचे गण्डूष धारण करून त्रैवृत धृताचे सेवन व भद्रदार्वादिगणोक्त द्रव्यांच्या काढ्याचा कवल धारण करावा. स्नैहिक धूमपान व नस्यदेखील दन्तहर्ष या रोगात लाभप्रद आहे.

दन्तशर्करा -

अहिसंन् दन्तमूलानि शर्करामुद्धरेद्भिषक् ।

लाभाचूर्णैर्मधुतैस्ततस्तां प्रतिसारयेत् ।।

दन्तहर्षक्रियाश्चापि कुर्यान्निरवशोषतः ।।[३१]

दाताच्या मुळांना वाचवित दातांवर जमलेली दन्त शर्करा अस्त्राने युक्तिपूर्वक काढून टाकावी त्या नंतर लाक्षा चूर्णामध्ये मध मिसळून त्या स्थानावर प्रतिसारण करावे व दन्तहर्षाची समस्त चिकित्सा करावी.

कपालिका कृच्छ्रसाध्या तत्राप्येषा क्रिया हिता ।।[३२]

जरी कपालिका क्षरज़ोग कृच्छ्रसाध्य असला तरी त्यामध्ये दन्तहर्षचिकित्सा केल्याने लाभ होतो.

जयेद्विस्रावणैः स्विन्नमचलं कृमिदन्तकम् ।

तथाऽवपीडैवातघ्नैः स्नेहगण्डूषधारणैः ।।

भद्रदार्वादिवर्षाभूलेपैः स्निग्धैश्च भोजनैः ।।[३३]

कृमिदन्त रोग असताना न हलणाऱ्या दातांना स्वेदन करून अशुद्ध रक्त मोचन करावे तसेच वातनाशक औषधींनी अवपीडन नस्य व त्याच औषधींच्या कल्क तथा क्काथाने सिद्ध केलेल्या तेल

किंवा तूप यांच्या गण्डूषांचे धारण व देवदारू, पुनर्नवा आदि शोथहर द्रव्यांचा लेप व स्निग्ध भोजन अशा उपायांनी चिकित्सा करावी.

हिङ्गु सोष्णन्त मतिमान क्रिमिदन्तेषु दीपयेत् ।।[३४]

कृमींनी ग्रसलेल्या दातांना (Carious teeth) त्यांच्या छिद्रांमध्ये किंचित गरम केलेले हिंग भरून उपाय करावा.

बृहतीभूमिकदम्बपञ्चाङ्गुलकण्टकारिकाक्काथः ।
गण्डूषतैलयुतः क्रिमिदन्तकवेदनाशमनः ।।[३५]

मोठी कण्टकारी, भूमिकदम्ब, एरंडाचे मूळ, छोटी कण्टकारी यांचा काढा करून त्यामध्ये तेल मिसळून गण्डूष धारण केल्यास कृमिदन्ताची पीडा शान्त होते.

नीलीवायसजङ्घास्नुग्दुधीनान्तु मूलमेकैकम् ।
सञ्चर्व्य दशनविधृतं दशनक्रिमिपातनं प्राहुः ।।[३६]

नीलवृक्ष, काकजङ्घा, थूहर, दूधी यामधील कोणत्याही एकाचे मूळ चावत राहिल्यास दातातील कृमि नष्ट होतात.

चलमुद्धृत्य वा स्थानं दहेतु शुषिरस्य वा ।।[३७]

कृमिंनी ग्रसलेला दात जर हलत असेल तर त्याला काढून टाकून दोषांची शुद्धी करण्यासाठी व रक्तस्राव थांबवण्यासाठी तप्त शलाकेने जे छिद्रयुक्त रिक्तस्थान आहे त्याला दग्ध करावे.

हनुमोक्षे समुद्दिष्टा कार्याचादितवत्क्रिया ।।[३८]

हनुमोक्ष रोगात अर्दित रोगोक्त चिकित्सा करावी.

सप्तच्छदार्कक्षीराभ्यां पूरणं कृमिशूलजित् ।
अथवा केवलेनार्क पयसाऽपि च शस्यते ।।[३९]

सतौनाचे दूध व आर्कचे दूध मिसळून कृमिग्रस्त दाताच्या छिद्रात भरल्याने किंवा केवळ आर्कदूध भरल्याने कृमि नष्ट होऊन दन्तशूल थांबतो.

**दन्तशब्दचिकित्सा -**

कर्कटाङ्घ्रिक्षीरपकघृताभ्यङ्गेन नश्यति।

दन्तशब्दः कर्कटाङ्घ्रिलेपाद्वा दन्तयोजितात्।।[४०]

खेकड्यांच्या पायांनी क्षीरसाधन परिभाषेनुसार दुग्ध सिद्ध करून त्यासह तूपाचा यथाविधि पाक करून प्रतिदिवस दातावर याचे घर्षण केल्यास दन्तशब्द (दांत किटकिटणे) बंद होते. खेकड्याचे पाय पाण्याबरोबर वाटून त्याचा लेप दातांवर लावल्यास दन्तशब्द नष्ट होतो.

चरणौ कर्कटकस्यापि गोक्षीरेण विपाचयेत्।

घनताञ्च गते तस्मिन् रात्रौ चरणलेपनात्।।

दन्तानां कड्मडी हन्ति सत्यं सत्यञ्च पार्वति ।।[४१]

खेकड्याचे दोन पाय वाटून १० तोळे गोदुग्धात घालून घट्ट होईतो शिजवून झोपतेवेळी पायांना याचा लेप लावल्यास दन्तकडमडी (कडकड शब्द करणे) नष्ट होतो.

कृष्णवर्णाश्वपुच्छस्य सप्तकेशेन वेणिका

तां बद्ध्वा च गले दन्तकड्मडीं हन्ति मानवः।।[४२]

काळ्या वर्णाच्या अश्वाच्या शेपटीचे सात केस तोडून त्याची वेणी बनवून गळ्यामध्ये बांधल्याने दन्तकड्मडी रोग नष्ट होतो. याच ग्रंथात (भैषज्यरत्नावली) दन्तरोगी व्यक्तिला काय वस्तू वर्ज्य आहेत ते निर्दिष्ट केले आहे.

फलान्यम्लानि शीताम्बु रूक्षान्नं दन्तधावनम्।

तथाऽतिकठिनान् भक्ष्यान् दन्तरोगी विवर्जयेत्।।[४३]

आंबट फळे, शीतल जल, रूक्ष अन्न, बाभळी आदि वृक्षांच्या दातवनाने दातांची सफाई, अत्यंत रूक्ष व कठीण भोज्य भक्षाचे सेवन हे दन्तरोगी व्यक्तीसाठी वर्ज्य आहे.

वाग्भटाच्या **'अष्टाङ्गहृदय'** या ग्रंथामध्ये दन्तरोगनिदान व चिकित्सा विस्ताराने स्पष्ट केली आहे. दन्तरोगनिदान व त्यानंतरच्या उपचारांविषयी वाग्भट लिहितात -

शीतदन्तविकार -

स्विन्नस्य शीतदन्तस्य पाली विलिखितां दहेत् ।
तैलेन प्रतिसार्या च सक्षौद्रघनसैन्धवैः ।
दाडिमत्वग्वरातर्क्ष्यकान्ताजम्ब्वास्थितानागीः ।
कवलः क्षीरिणां क्वाथैरणुतैलं च नावनम् ।।[४४]

शीतदन्त विकार झाला असता दातास स्वेद करून हिरडी खरवडून तेलाचा डाग द्यावा व नागरमोथे, सैंधव, डाळिंबाची साल, त्रिफळा, रसांजन, गव्हला, जांभळीची बी व सुंठ यांचे चूर्ण मधात कालवून चोळावे. क्षीरिवृक्षांच्या काढ्याचा कवल धरावा व अणुतेल नाकात घालावे.

दन्तहर्ष व दन्तभेद -

दन्तहर्षे तथा भेदे सर्वा वातहरा क्रिया ।
तिलयष्टीमधुश्रुतं क्षीरंम् गण्डूषधारणम् ।।[४५]

दन्तहर्ष व दन्तभेद यावर सर्व वातनाशक् चिकित्सा करावी. तीळ व ज्येष्ठमध यांनी सिद्ध केलेल्या दूधाचे गुळणे करावे.

दन्तचाल -

सस्नेहं दशमूलाम्बू गण्डूषः पचलद्विजे ।।
तुत्थरोध्रकणाश्रेष्ठापत्तङ्गपटुघर्षणम् ।
स्निग्धाः शील्या यथावस्थं नस्यान्नकवलादयः ।।[४६]

दन्तचालावर दशमूलाच्या काढ्यात स्नेह करून त्याचे गुळणे करावे. मोरचूद, लोध्र, पिंपळी, त्रिफळा, पतंग व सैन्धव यांच्या चुर्णाने दात घासावे व स्निग्ध असे नस्य, अन्न व कवल सेवन करावे.

**अधिदन्त -**

अधिदन्तकमलालिप्तं यदा क्षारेण जर्जरम् ।

कृमिदन्तमिवोत्पाट्य तद्वच्चोपचरेत्तदा ॥

अनवस्थितरक्त च दग्धे व्रण इव क्रिया ॥[४७]

अधिदन्तास क्षार लावून तो हलू लागला म्हणजे कृमिदन्ताप्रमाणे उपटून पुढील क्रियाही तशीच करावी. रक्त बंद न झाल्यास डाग देऊन व्रणाप्रमाणे चिकित्सा करावी.

**दन्तशर्करा -**

अहिंसन् दन्तमूलानि दन्तेभ्यः शर्करां हरेत् ॥

क्षारचूर्णैर्मधुयुतैस्ततश्च प्रतिसारयेत् ।[४८]

हिरड्यांस ईजा होऊ न देता दातांवरील खपल्या खरवडून काढून क्षार व चूर्ण मधात कालवून ती वरून चोळावी.

कपालिकायामप्येवं हर्षोक्तं च समाचरेत् ॥[४९]

दंतकपालिकेवर व दन्तहर्षावर देखील अशीच चिकित्सा करावी.

जयेद्विस्रावणैः स्वित्रमचलं कृमिदन्तकम् ।

स्निग्धश्चालेपगण्डूषनस्याहारैश्चलापहैः ।

गुडेन पूर्णं सुषिरं मधूच्छिष्टेन वां दहेत् ।

सप्तच्छदार्कक्षीराभ्यां पूरणं कृमिशूलजित् ॥[५०]

कृमिदन्त हलत नसेल तर स्वेद करून रक्त काढावे. वातघ्न व स्निग्ध असे लेप, गुळणे, नस्य व आहार असावे. पोकळ असलेला दांत गुळाने किंवा मेणाने भरून नंतर (तप्त शलाकेने) डाग द्यावा. तसेच सात्वीण व रूई यांचा चीक भरला असता ठणका कमी होतो.

हिङ्गुकटफलकासीसस्वर्जिकाकुष्ठवेलजम् ।

रजो रूजं जयत्याशु वस्त्रस्थं दशने धृतम् ॥[५१]

हिंग, कायफळ, हिराकस, साजीखार, कोष्ठ व मिरी यांच्या चूर्णाची फडक्यात पुरचुंडी करून ती दाढेत धरली असता कळ कमी होते.

गण्डूषं धारयेत्तैलमेभिरेव च साधितम् ।

क्वाथैर्वा युक्तमेरण्डद्विव्याघ्रीमूकदम्बजैः ।।[५२]

याच सर्व औषधांनी सिद्ध केलेल्या तेलाचे गुळणे करावे किंवा एरंडमूळ, रिंगणी, डोरली, गोरखमुंडी यांच्या काढ्यात मिसळून गुळणे करावे.

क्रियायोगैर्बहुविधैरित्यशान्तरूजं भृशम् ।

दुढमप्युद्धरेद्दन्तं पूर्वं मूलाद्विमोक्षितम् ।

सन्दंशकेनप लघुना दन्तनिर्वातिनेन वा ।

तैलं सयष्ट्याह्वरजो गण्डूषो मधुना ततः ।[५३]

अशा प्रकारच्या उपायांनी जर विकार बरा न होईल तर दांत जरी बळकट असला तरी तो मूळापासून सोडवून धाकट्या चिमट्याने किंवा दन्तनिर्घातनशस्त्राने उपटून काढावा व नंतर ज्येष्ठमधाचे चूर्ण, मध व तेल यांच्या गुळण्या कराव्या.

ततो विदारियष्ट्याह्वशृङ्गाटककसेरूभिः ।

तैलं दशगुणक्षीरसिद्धं युञ्जीत नावनम् ।। [५४]

भुईकोहळा, ज्येष्ठमध, शिंगाडे, कचुला यांचा कल्क व दसपट (तेलाच्या) दूध यांनी सिद्ध केलेले तेल नाकांत घालावे.

कृशदुर्बलवृद्धानां वातार्तानां च नोद्धरेत् ।

नोद्धरेच्चोत्तरं दन्तं बहूपद्रवकृद्धि सः ।।

एषामप्युद्धृते स्निग्धः स्वादुः शातः क्रमो हितः ।[५५]

कृश, अशक्त, वृद्ध व वातपीडित अशा मनुष्यांचा दांत उपटू नये. तसेच वरचा दांत उपटू नये. कारण तो काढला असता अनेक विकार होऊ शकतात. अशा रोग्यांचा दांत जर उपटलाच तर त्यावर स्निग्ध, मधुर व थंड अशी चिकित्सा करावी.

विस्राविते शीतादे सक्षौद्रैः प्रतिसारणम् ॥

मुस्तार्जुनत्वक्त्रिफलाफलिनीतार्क्ष्यनागरैः ।

तत्क्वाथः कवलो नस्यं तैलं मधुरसाधितम् ॥[५६]

शीताद झाला असता रक्त काढून नंतर नागरमोथे, अर्जुनाची साल, त्रिफळा, गव्हला, रसांजन व सुंठ यांचे चूर्ण चोळावे. यांच्याच काढ्याने गुळणे करावे व मधुरवर्गातील औषधांनी सिद्ध केलेल्या तेलाचे नस्य करावे.

दन्तमांसान्युपकुशे स्विन्नान्युष्णाम्बुधारणैः ।

मण्डलाग्रेण शाकादिपत्रैर्वा बहुशो लिखेत् ॥

ततश्च प्रतिसार्याणि घृतमण्डमधुप्लुतैः ।

लाक्षाप्रियङ्गुपत्तङ्गलवणोत्तमगैरिकैः ॥

सकुष्ठशुण्ठीमरिचयष्टीमधुरसाञ्जनैः ।

सुखोष्णो घृतमण्डोऽनु तैलं वा कवलग्रहः ॥

घृतं च मधुरैः सिद्धं हितं कवलनस्ययोः ।[५७]

उपकुश नामक विकार झाला असता ऊन पाण्याने गुळणे करून हिरड्या शेकल्यानंतर मंडलाग्राने किंवा साग वगैरेच्या पानांनी अनेक वेळा घासून लाख, गव्हला, पतंग, सैंधव, गेरू, चोक, सुंठ, मिरी, ज्येष्ठीमध, मोहोटा, रसांजन यांचे चूर्ण तूपाची निवळ व मध यांत कालवून वर चोळावे. नंतर तुपाची निवळ किंवा तेल किंचित ऊन करून त्याचे कवल करावे व मधुर औषधांनी सिद्ध केलेल्या तुपाचे कवल व नस्य करावे.

'हारीतसंहिता' या आयुर्वेदीय ग्रंथामध्ये दन्तरोगलक्षण व दन्तरोगचिकित्सा पुढीलप्रमाणे सांगितली आहे -

दन्तरोगलक्षण -

कृष्णा दन्तावलिर्यस्य दन्तमूलं च वातिकात् ।
चलनं वा प्रदृश्येत वातिकश्च विनिर्दिशेत् ॥
पैत्तिकात्पित्तदाहश्च दन्तमांसं विनिर्दिशेत् ।
श्लैष्मिके दन्तपाके च शोफः स्याच्छ्वेतता भृशम् ॥
रक्तजे जायते कण्डूरक्तस्रावश्च दृश्यते ।
शूयते दन्तमांसश्च सरक्ते दंतपुटे तथा ॥
सच्छिद्रं दन्तमूलश्च सबलं शूलमेव च ।
दन्तमांसं विशीर्येत क्रिमिजा दन्तरुग्भवेत् ॥ [५८]

ज्याचे दांत व दातांची मुळे काळी होतात व ज्याचे दांत हलू लागतात त्याला 'वातिक दंतरोग' झाला आहे असे समजावे. पित्तज ओष्ठ रोगात पित्ताची लक्षणे दिसतात. तसेच दातांवर मांस वाढते. कफज पाकदन्त रोगात शोथ व श्वेतिमा होतो. रक्तज दन्तरोगांत खाज व रक्तस्राव होतो. दन्तमांसांत शोथ व दन्तपुटात रक्तवर्ण असतो. दन्तमूल छिद्रयुक्त असले, अतिशूल (वेदना) असला, दन्तमांस खण्ड खण्ड होऊन तुटतो. अशा प्रकारच्या दन्तरोगाला कृमिज दन्तरोग समजावे.

**दन्तरोग चिकित्सा -**

वचावयानीसहचित्रणेण सिन्धूत्थविश्वासहसिन्धुवारम् ।
कल्कं तथोष्णश्च सदन्तरोगे मुखे च गण्डूषशतानिपश्च ॥
सर्वेषु मुखरोगेषु हितमेतत्प्रशस्यते ।
वचासैन्धवशुण्ठ्या च घर्षणं दन्तमूलके ॥
यवानीं च वचा रात्रौ दन्तमूले च धारयेत् ।
पित्तजदन्तरोगेशु नवनीतं सशर्करम् ॥

धात्रीफलेन संघृष्टम् दन्तरोगनिवारणम् ।
श्लेष्मिकदन्तरोगेषु हरीतक्या गुडेन वा ।।
घर्षणं च प्रशस्तं च त्रिफलाकाथसंयुतम् ।
अहिमारकमूलस्य काथो गण्डूषधारणात् ।।
खदिरस्य तथा काथो यवानीकाथ एव च ।
काथश्च निम्बमूलस्य दन्तरोग निवारणः ।।
रक्तजे च विकारे च घर्षोलवणसर्षपैः ।
रक्तश्च स्रावयेतस्य इष्टमोष्टपुटे च तत् ।।
विडङ्ग हिङ्गु सिन्धुश्च वचाचूर्णेन घर्षयेत् ।
क्रिमिजदन्तरोगेषु हितमेतत्प्रशस्यते ।।[५१]

वच, अजवायन, चिरायता, सैंधव मीठ, सभालू याचा कल्क बनवून गरम करून दातांवर लेप लावावा. याच कल्काने पांचशे वेळा चुळा भरल्यास सर्व प्रकारच्या मुखरोगांचा उपचार होतो. वच, सैंधव मीठ व सुंठ यांचे चूर्ण दन्तमूलाशी घासल्याने तसेच अजवायन, वच यांना रात्री दन्तमूलाशी ठेवल्यास दन्तमूलरोगात आराम मिळतो. पित्तज दन्तरोगामध्ये दांताला लोणी लावावे. आंवळा किसून दाताला लावल्यास फायदा होतो. कफज दंतरोगामधे हरीतकी किंवा गूळ, त्रिफळा यांचा काढा लावल्यास फायदा होतो. खैर, ओवा व निम्बमूळ याचा काढा दन्तरोगनिवारण करतो. अहिमारकमूळाचा काढा किंवा गण्डूष धारण केल्याने फायदा होतो. रक्तज दन्तरोगात मीठ व सरसू दातावर चोळल्यास फायदा होतो. या रोगात रक्तमोक्षण देखील करावे. विडंग, हिंग, सैंधव मीठ, वच यांचे चूर्ण दातांवर चोळल्यास कृमिज दन्तरोगात लाभ होतो.

दन्तरोगांवरील या सर्व उपचारांवरून हे दिसते की गण्डूष, कवल व चूर्ण या प्रकारांनी शक्यतो दंतरोग आटोक्यात आणण्याचे प्रयत्न प्राचीन काळी सर्वमान्य होते. ज्यावेळेस या चिकित्सांनी रोगप्रतिबंध होण्याची शक्यता कमी होती केवळ त्याच वेळेस शस्त्रक्रिया सांगितली आहे.

याचाच अर्थ हा की प्राचीन काळी प्रतिबंधात्मक व औषधी उपाययोजना (Conservative Treatment) अधिक प्रमाणात केली जात होती. केवळ ज्या वेळेस या इलाजांनी यशप्राप्तीची आशा नसेल त्याच वेळेस शस्त्राद्वारे इलाज केला जात होता असे स्पष्ट होते.

उपरोक्त संकलनावरून व वैद्यांच्या संपर्कात येऊन त्यांनी वापरलेल्या काढीषधींच्या उपयोगावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात. त्या अशा की - आयुर्वेदाच्या दन्तचिकित्सेमध्ये गण्डूष व कवल यांचे विशेष महत्त्व आहे. आधुनिक दन्तचिकित्सेमध्ये Mouth Gargels, Ointments वगैरेंना जरी महत्त्व असले तरी ते मुख्य इलाजाच्या सहाय्याकरिता असते. केवळ औषधाचे गुळणे व दातांना व हिरड्यांना औषधी चोळून आधुनिक दन्तरोगचिकित्सा केली जात नाही.

मुबलक प्रमाणात उपलब्ध असलेल्या निसर्गसंपदेमधून वनस्पतींचे औषधीगुण शोधणे, त्या औषधींचा शरीरातील विकारांवर होणारा परिणाम जाणून घेऊन त्यानुसार उपचार करणे यासाठी प्राचीन आयुर्वेदाचार्यांनी घेतलेले कष्ट प्रशंसायोग्य आहेत यात शंका नाही.

आधुनिक काळामध्ये अनेक वैज्ञानिक साधने उपलब्ध असल्या कारणाने दन्तचिकित्सा केवळ गण्डूष, कवल व चूर्ण येथपर्यंत सीमित न राहता अतिशय विकसित झाली आहे. या चिकित्सेचे यांत्रिकीकरण झाले आहे असे देखील म्हणता येईल. मानवी बुद्धिमत्ता, हस्तकौशल्ये व अत्याधुनिक यंत्रक्षमता या तिघांची सुयोग्यरीतीने सांगड घालून आजच्या प्रगत काळात दन्तरोगचिकित्सादेखील प्रगतावस्थेत आहे. विज्ञान हे उत्तरोत्तर विकसित होत जाणारे असल्यामुळे भविष्यकाळातील दन्तरोगनिदान व दन्तरोगचिकित्सा दोन्हीही अजूनही प्रगत होतील यात शंका नाही.

*****

याचाच अर्थ हा की प्राचीन काळी प्रतिबंधात्मक व औषधी उपाययोजना (Conservative Treatment) अधिक प्रमाणात केली जात होती. केवळ ज्या वेळेस या इलाजांनी यशप्राप्तीची आशा नसेल त्याच वेळेस शस्त्राद्वारे इलाज केला जात होता असे स्पष्ट होते.

उपरोक्त संकलनावरून व वैद्यांच्या संपर्कात येऊन त्यांनी वापरलेल्या काहीयधींच्या उपयोगावरून दोन गोष्टी स्पष्ट होतात, त्या अशा की – आयुर्वेदाच्या दन्तचिकित्सेमध्ये गण्डूष व कवल यांचे विशेष महत्त्व आहे. आधुनिक दन्तचिकित्सेमध्ये Mouth Gargels, Ointments वगैरेंना जरी महत्त्व असले तरी ते मुख्य इलाजाच्या सहाय्याकरिता असते. केवळ औषधाचे गुळणे व दातांना व हिरड्यांना औषधी चोळून आधुनिक दन्तरोगचिकित्सा केली जात नाही.

मुबलक प्रमाणात उपलब्ध असलेल्या निसर्गसंपदेमधून वनस्पतींचे औषधीगुण शोधणे, त्या औषधींचा शरीरातील विकारांवर होणारा परिणाम जाणून घेऊन त्यानुसार उपचार करणे यासाठी प्राचीन आयुर्वेदाचार्यांनी घेतलेले कष्ट प्रशंसायोग्य आहेत यात शंका नाही.

आधुनिक काळामध्ये अनेक वैज्ञानिक साधने उपलब्ध असल्या कारणाने दन्तचिकित्सा केवळ गण्डूष, कवल व चूर्ण येथपर्यंत सीमित न राहता अतिशय विकसित झाली आहे. या चिकित्सेचे यांत्रिकीकरण झाले आहे असे देखील म्हणता येईल. मानवी बुद्धिमत्ता, हस्तकौशल्ये व अत्याधुनिक यंत्रक्षमता या तिघांची सुयोग्यरीतीने सांगड घालून आजच्या प्रगत काळात दन्तरोगचिकित्सादेखील प्रगतावस्थेत आहे. विज्ञान हे उत्तरोत्तर विकसित होत जाणारे असल्यामुळे भविष्यकाळातील दन्तरोगनिदान व दन्तरोगचिकित्सा दोन्हीही अजूनही प्रगत होतील यात शंका नाही.

*****

# संदर्भसूची


१. मा. नि. १

२. मा. नि. १

३. शा. सं. अ १०/१

४. शा. सं. अ १०/२,३

५. शा. सं. अ १०/४

६. शा. सं. अ १०/१२

७. शा. सं. अ १०/१९

८. शा. सं. अ १०/२०

९. शा. सं. अ १०/२१

१०. भै. र. ६१/१०,११

११. भै. र. ६१/१२

१२. भै. र. ६१/१३

१३. भै. र. ६१/१४

१४. भै. र. ६१/१५,१६

१५. भै. र. ६१/१७

१६. भै. र. ६१/१८

१७. भै. र. ६१/१९

१८. भै. र. ६१/२०

१९. भै. र. ६१/२१

२०. भै. र. ६१/२२,२३

२१. भै. र. ६१/२४

२२. भै. र. ६१/२५

२३. भै. र. ६१/२६

२४. भै. र. ६१/२७

२५. भै. र. ६१/२८

२६. भै. र. ६१/२९,३०

२७. भै. र. ६१/३१

२८. भै. र. ६१/३२,३३

२९. भै. र. ६१/३४

३०. भै. र. ६१/३५,३६

३१. भै. र. ६१/३७

३२. भै. र. ६१/३८

३३. भै. र. ६१/३९

३४. भै. र. ६१/४०

३५. भै. र. ६१/४१

३६. भै. र. ६१/४२

३७. भै. र. ६१/४३

३८. भै. र. ६१/४४

३९. भै. र. ६१/४५

४०. भै. र. ६१/४६

४१. भै. र. ६१/४७

४२. भै. र. ६१/४८

४३. भै. र. ६१/४९

४४. सा. वा. अ. २२/११, १२

४५. सा. वा. अ. २२/१३

४६. सा. वा. अ. २२/१४,१५

४७. सा. वा. अ. २२/१६

४८. सा. वा. अ. २२/१७

४९. सा. वा. अ. २२/१८

५०. सा. वा. अ. २२/१९,२०

५१. सा. वा. अ. २२/२१

५२. सा. वा. अ. २२/२२

५३. सा. वा. अ. २२/२३,२४

५४. सा. वा. अ. २२/२५

५५. सा. वा. अ. २२/२६

५६. सा. वा. अ. २२/२७,२८

५७. सा. वा. अ. २२/२९-३१

५८. हा. सं. अ. ४६/५-८

५९. हा. सं. अ. ४६/९-१६

*****

प्रातःकालीन स्वच्छता झाल्यावर दंतधावन करावे. याकरिता धव, पळाश, न्यग्रोध, नक्तमाल, शिरीष, करवीर, जाती व अर्जुन या वृक्षांना उत्तम मानतात (पुनर्वसू). हिरड्यांना बाधा न करता हळूहळू दंतधावन करावे. अशारीतीने मुखातील कफ-पित्ताचे शोधन व वात-रक्ताचे शमन होते.

याज्ञवल्क्यशिक्षा, नारदीयशिक्षा व माण्डूकीयशिक्षा या ग्रंथांमध्ये देखील दन्तधावनाकरिता उपयोगी असलेल्या वृक्षांचा निर्देश आहे. अमरकोशामध्ये 'खदिर' या वृक्षाचे नांव दंतधावनाकरिता दिलेले आहे.

गायत्री बालतनयः खदिरो दन्तधावनः ।

अमरकोश २-४-४९

अत्र गायन्तं त्रायते अतः गायत्री

स्वामिनोक्तायां व्याख्यायां

खदिरो रक्तसारश्च गायत्री दन्तयधावनः ।

कण्टकी बालपत्रश्च जिह्वाशल्य क्षितिसमः ।

पलाशे किंशुकः पर्णो वातपोथः ।

अमरकोश २-४-२९

'आयुर्वेदीय स्वस्थवृत्त' या पुस्तकामधे वैद्य नारायणशास्त्री जळूकर यांनी दन्तधावन, त्याकरिता योग्य वनस्पती, त्या वनस्पतींच्या वापराच्या पद्धती, दांत घासण्याचा क्रम, वनस्पतींच्या अभावी काय वापरावे, जिह्वानिर्लेखन, दन्तधावनाकरिता वर्ज्य वनस्पती, दन्तधावन समय, दन्तधावन निषेध अशा मुखाच्या दैनंदिन स्वच्छतेविषयीच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकला आहे. आपल्या लिखाणात वैद्य नारायणशास्त्री जळूकर पुढीलप्रमाणे माहिती देतात -

**दन्तधावन -**

मलविसर्जनानंतर मुखशुद्धीचे कार्य क्रमप्राप्त असून त्याची सुरूवात दंतधावनाने होते. दांत हे तोंडात चर्वणाचे महत्त्वाचे कार्य करतात. अन्नपचन सुलभतेने होण्याकरिता अन्नचर्वण नीट होणे

अत्यंत आवश्यक आहे. दांत बळकट व निरोगी असतील तरच चर्वण नीट होईल. याकरिता दांत स्वच्छ ठेवणे इष्ट आहे. या क्रियेला 'दन्तधावन' असे म्हणतात.

### दांत घासण्यास योग्य वनस्पती -

वटासनार्कखदिरकरंजकरवीरजम् ।
सर्जारिमेदापामार्गमालतीककुभोद्भवम् ।
कषायतिक्तकटुकं मूलमन्यदपीदृशम् ।
विज्ञातवृक्षं क्षुण्णाग्रं ऋज्वग्रन्थिसुभूमिजम् ।।[२]

वड, असाणा, रूई, खैर, करंज, कण्हेर, राळेचा वृक्ष, शेण्याखैर, अघाडा, चमेली, अर्जुन, सादडा या किंवा यांच्यासारख्या तुरट, कडू किंवा तिखट रस असलेल्या वृक्षांचे मूळ दन्तधावनासाठी वापरावे.

### दन्तधावन कसे वापरावे? -

त्या मूळाचे टोक चावून चावून कुंचलीसारखे करावे. करंगळीच्या टोकाइतके जाड व बारा अंगुळे लांब असावे असे ते मूळ कुंचलीसारखे केल्यावर त्याने दांत घासावे. त्या वेळी बोलू नये व घासतेवेळी दातांवरच्या हिरड्यांना दुखवू नये.

कनीन्यग्रसमस्थौल्यं सुकूर्च द्वादशाङ्गुलम् ।
प्रातर्भुत्क्वा च यतवाक् भक्षयेद्दन्तधावनम् ।।[३]

याच पुस्तकात वनस्पतींच्या रसाविषयीचे सुश्रुताचे मत पुढीलप्रमाणे दिले आहे.

निम्बश्च तिक्तके श्रेष्ठः कषाये खदिरस्तथा ।
मधुको मधुरे श्रेष्ठः करंजः कटुके तथा ।। (सुश्रुत चिकित्सा २४-३)[४]

तुरट, कडू व तिखट रसांशिवाय मधुर रस वनस्पतींचा उपयोग सुश्रुत संहितेत सांगितला आहे. या चार वनस्पतींमधे देखील कडू रसाची वनस्पती दन्तधावनाकरिता उत्तम मानली जाते.

कदाचित याचा संबंध पचनसंस्थेच्या निरोगत्वाशी असू शकतो. कारण दंतधावनसमयी दन्तधावनाकरिता वापरलेल्या वनस्पतीचा रस मुखातील लाळेबरोबर मिश्रित होऊन थोड्या प्रमाणात निश्चितपणे गिळल्या जातो. कडू रसाच्या वनस्पतींमधे कडुनिम्बाला दन्तधावनाकरिता प्राधान्याने मान्यता आहे. याचे अजून एक सामान्य कारण याची मुबलक प्रमाणातील उपलब्धता हे देखील असू शकते. तुरट रसासाठी खैराची काडी, मधुर रसासाठी मोहाची काडी व तिखट रसासाठी करंजाची काडी या उत्कृष्ट मानल्या जातात.

शोधन व रोपण क्रियेत तुरट, कडू व तिखट रसांचा उपयोग होतो. म्हणून इतर ग्रंथात याच तीन रसांचा उल्लेख आहे. परंतु शमन कार्याकरिता मधुर रसाची उपयुक्तता आहे. या दृष्टीने सुश्रुताचे प्रतिपादन (तुरट, कटु, तिखट व मधुर या चारही रसांच्या वनस्पतींचा दन्तधावन कार्याकरिता उपयोग करता येतो) वैशिष्ट्यपूर्ण मानले पाहिजे.

### दांत घासण्याचा क्रम -

वनस्पतीची कुंचली, सध्या प्रचारात असलेले टूथब्रश किंवा यांच्या अभावी अंगठ्याजवळचे पहिले बोट (तर्जनी) याने दांत घासावेत. पण त्यात देखील प्रथम खालचे दांत घासून स्वच्छ करावे व नंतर वरचे दांत स्वच्छ करावे.

### वनस्पतींच्या अभावी काय वापरावे? -

सर्वत्र, सर्वदा वनस्पतींची मुळे उपलब्ध होण्याची शक्यता कमी आहे. अशा वेळेस तुरट, कडु वा तिखट अशा रसद्रव्यांच्या चूर्णाचा उपयोग करावा असे शास्त्रात सांगितले आहे.

व्याप्य त्रिवर्ग त्रितय क्षौद्राक्तेन च घर्षयेत् ।

शनैस्तेन ततो दन्तान्दन्तमांसान्यबाधयन् ।।[५]

अशा रसांच्या द्रव्यात कोष्ठ, त्रिकटु (सुंठ, मिरे, पिंपळी), त्रिफळा (हिरडेदळ, बेहडेदळ, आवळकाठी), त्रिजात (दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे) यांचा प्रामुख्याने समावेश होतो. यांसचे चूर्ण मधात कालवून त्याने दांत घासावेत.

## दन्तधावनक्रिया -

दांत स्वच्छ करताना सावकाशपणे व दांताभोवतालच्या मांसल भागाला इजा पोहोचणार नाही अशी दक्षता घेत दन्तधावनक्रिया करावी. वनस्पतींच्या काड्यांना व्यवहारात 'दांतवण' असे म्हणतात व त्या काड्यांऐवजी वापरल्या जाणाऱ्या चूर्णाला 'मंजन' असे म्हणतात. बाजारात आयती विकत मिळणारी मंजने, टूथपेस्ट किंवा टूथपावडर विकत घेतेवेळी सुगंध, रंग व गोड रूची यांचा अधिक विचार न करता त्यामधे दन्तधावनक्रियेसाठी उपयुक्त रसद्रव्ये आहेत किंवा नाहीत याकडे भर असावा.

## जिह्वा निर्लेखन -

सुवर्णरूप्यताम्राणि त्रपुरीतिमयानि च ।

जिह्वानिर्लेखनानि स्युः । चरक ५/७४-७५[६]

दांत स्वच्छ झाल्यानंतर जीभ स्वच्छ करण्याकरिता निरनिराळ्या धातुंच्या पट्टीची योजना केली जाते. याकरिता सुवर्ण, रौप्य व ताम्र हे धातु योग्य मानले जातात. दांतवणाचीच काडी उभी चिरून एका भागाचा उपयोग फारसा जोर न देता करता येतो. जिह्वा निर्लेखनाने जीभेवरील मल स्वच्छ केला जातो. तोंडाची अरूची व दुर्गन्धि नष्ट होतात. तोंडामधे हलकेपणा येतो. स्वच्छ मुखामधे जन्तुंचा प्रादुर्भाव कमी प्रमाणात होतो.

नियमितपणे व योग्य पद्धतीने दन्तधावन क्रिया व जिह्वा निर्लेखन केल्याने जिह्वा, मुख व दन्त रोग होण्याची शक्यता फार कमी होते.

## दन्तधावनाकरिता वर्ज्य वनस्पती -

नैव श्लेष्मातकारिष्ट बिभीत धवधणन्वजान् ।

बिल्ववंजुलनिर्गुंडी शिग्रुतिल्वकविन्दुकान् ।

कोविदारशमीपीलुपिप्पलेंगुदगुग्गुलून् ।

पारिभद्रकमम्लीकामोचक्यौ शाल्मली शणम् ।

स्वादम्ललवणं शुष्कं सुषिरं पूतिपिच्छिलम् ।

पालाशमासनं दन्तधावनं पादुके त्यजेत् ।। वृद्धवाग्भट[७]

भोकर, रिठा, बेहडा, धावडा, नेवती, बेल, बोरू, निर्गुंडी, शेवगा, लोघ्र, टेंभूर्णी, काचनार, शमी, पीलू, पिंपळ, हिंगणबेट, गुग्गुळ, देवदार, चिंच, सावेरी, केळ व सण यांचा दन्तधावनात उपयोग करू नये. शिवाय इतरही मधुर, अम्ल व लवण रस वनस्पती किंवा द्रव्यांचा तसेच योग्य मानलेली पण वाळलेली, पोकळ, दुर्गंधीयुक्त अथवा बुळबुळीत झालेली द्रव्ये किंवा वनस्पती दंतधावनासाठी वापरू नयेत. याशिवाय पळसाची काडी दन्तधावनास व त्याचे लाकूड पाट किंवा खडावांसाठी वापरू नये.

**दन्तधावन समय -**

दन्तधावन केवळ सकाळीच करावे असे नाही, तर ते प्रात:समयी, दोन वेळच्या जेवणानंतर, रात्री झोपण्यापूर्वी व इतरही वेळा काही खाद्यपेय घेतल्यानंतर मुखस्वच्छतेच्या दृष्टीने आवश्यक आहे. अशी स्वच्छता झाली तरच दांतातून चिकटलेले व अडकलेले खाद्यपेयांचे कण व अंश निघणे शक्य आहे. ते तसे पूर्णपणे निघावेत, साचून कुजू नयेत, ती घाण दन्तमुळांशी जिरून दात रोगट होऊ नयेत व मुखदुर्गंधीपासून बचाव व्हावा हाच या प्रतिपादनाचा हेतु आहे.

आजच्या यंत्रयुगामध्ये एकंदरच जीवनशैली घाईगर्दीची झालेली असल्याकारणाने प्राचीन आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये सांगितल्यानुसार दिनचर्येमधे दन्तधावनक्रिया संपूर्णपणे समाविष्ट करणे सामान्य जनांना समय अभावाने कठीण जाईल. पण दररोज प्रात:समयी व रात्री निजण्यापूर्वी दांत स्वच्छ केल्यास व इतर वेळी खाद्यपेयांच्या ग्रहणानंतर शुद्ध जलाने खळखळून चुळा भरल्यास देखील मुखाची स्वच्छता व आरोग्य समाधानकारक रीतीने पाळता येते.

दन्तधावन निषेध -

न स्वादेत् गलताल्वोजिह्वारोगसमुद्भवे ।

अथास्यपाके श्वासे च कासहिक्कावमीषु च ।

दुर्बलोऽजीर्ण भक्तश्च मूर्च्छार्तो मदपीडितः ।

शिरोरूगार्तस्तृषितः श्रान्तः पापनक्लमान्वितः।

अर्दिती कर्णशूली च दन्तरोगी च मानवः ।। सुश्रुत २४-१०-१२[८]

गळा, टाळू, ओठ व जीभ यांचे विकार, तोंड येणे, श्वास रोध, खोकला, उचकी, वान्ती, मूर्च्छा, मद, डोकेदुखी, तहान, अर्दित रोग, कर्णरोग, दन्तरोग झालेले असतां, फार दुर्बलावस्था असेल, अजीर्ण झाले असेल (अजीर्ण म्हणजे अन्न जीर्ण-पचन झालेले नसेल तेव्हा), अत्यंत थकवा आलेला असेल, मद्यपानाची ग्लानी असेल तेव्हा दंतधावन करू नये.

**'भावप्रकाश'** या ग्रंथामध्ये दंतकाष्ठविधी व जिह्वानिर्लेखन याविषयी निर्देश पुढीलप्रमाणे केलेला आहे.

अथ दन्तकाष्ठविधिमाह -

भक्षयेद्न्त पवनं द्वादशाङ्गुलमायतम् ।

कनिष्ठिकाऽग्रवत्स्थूलमृज्वग्रन्थिं तथाऽव्रणम् ।।

एकैकं घर्षयेद्न्तं मृदुना कूर्चकेन तु।

दन्तशोधनचूर्णेन दन्तमांसान्यबाधयन् ।।[९]

दांतवण करण्याचा विधि - बारा अंगुले लांब, कनिष्ठिका (करंगळी), अंगुलीच्या अग्रभागाइतपत जाड, सरळ, गांठरहित, व्रणरहित, गुळगुळीत, कोठेही वरचे आवरण छिन्न न झालेली, अशी दातवणाची काडी घेऊन त्याची मऊ कुंचली बनवून दांत स्वच्छ करण्याच्या चूर्णाने (मंजनाने) हिरड्यांना न दुखवता एक एक दांताला चोळावे.

क्षौद्रत्रिकटुकाक्तेन तैलसिन्धुभवेन वा ।

चूर्णेन तेजोवत्याश्च दन्तान्नित्यं विशोधयेत् ।।[१०]

त्रिकटु (सुंठ, पीपल, काळी मिरी)यांचे चूर्ण मधामधे मिसळून किंवा सैंधव मीठ तेलात मिसळून किंवा तेजवल्कलचूर्णाने दांत साफ करावे.

मधुको मधुरे श्रेष्ठः करञ्जः कटुके तथा।
निम्ब स्यात्तिक्तके श्रेष्ठः कषाये खदिरस्तथा।।
समयं तु समालोक्य दोषं च प्रकृतिं तथा ।
यथौचितै रसैर्वीर्यैर्युक्तं द्रव्यं प्रयोजयेत् ।।
तेनास्य मुखवैरस्यदन्तजिह्वाऽऽस्यजा गदाः।
रूचिवैशद्यलघुता न भवन्ति भवन्ति च ।।
अर्के वीर्ये वटे दीप्तिः करञ्जे विजयो भवेत् ।
प्लक्षे चैवार्थसम्पत्तिर्वैदर्यां मधुरोध्वनिः ।।
खदिरे मुखसौगन्ध्यं बिल्वे तु विपुलं धनम् ।
उदुम्बरे तु वाक्सिद्धिराम्रे त्वारयोग्यमेव च ।।
कदम्बे तु धृतिर्मेधा चम्पके च दृढा मतिः ।
शिरीषे कीर्त्तिसौभाग्यमायुरारोग्यमेव च ।।
अपामार्गे धृतिर्मेधा प्रज्ञाशक्तिस्तथाऽसने।
दाडिम्यां सुन्दराकारः ककुभे कुटजे तथा ।।
जातीतगरमन्दारैर्दुःस्वप्नं च विनश्यति ।।[११]

मधूरासाठी मोह, कटुसाठी करंज, तिक्तासाठी कडुलिंब, व कषायसाठी खैर या वृक्षांच्या काडीचे दांतवण उत्तम मानले जाते. समय, दोष व प्रकृति यांच्यानुसार योग्य रसाने युक्त जे द्रव्य असेल त्याचाच उपयोग दांत स्वच्छ करण्याच्या वेळेस करावा असे केल्याने मुखातील विरसता, दांत, जीभ व मुख यांत होणारे रोग, यापासून रक्षण होते. भोजनातील रूची, मुखातील स्वच्छता व शरीरातील हलकेपणा या तिन्हीमध्ये वाढ होते.

मंदाराच्या दांतवणाने शक्ति, वडाच्या दांतवणाने दीप्ति, करंजच्या दांतवणाने विजय, पाकरच्या
वणाने धनसंपत्ती, बोराच्या दांतवणाने मधुर आवाज, खदिराच्या दांतवणाने मुखाला सुगंध,
च्या दांतवणाने विपुल धन, औदुम्बराच्या दांतवणाने वाक्सिद्धी, आंब्याच्या दांतवणाने आरोग्य,
म्बाच्या दांतवणाने धैर्य व मेधा (धारणाशक्ती), चम्पकाच्या दांतवणाने दृढ-स्थिर बुद्धी, शिरीषाच्या
तवणाने कीर्ती, सौभाग्य, आयु, आरोग्य, चिरचिटाच्या दांतवणाने धैर्य व मेधा, विजयसाराच्या
तवणाने प्रज्ञा शक्ति, डाळिंब, अर्जुन व कुटज यांच्या दांतवणाने सुंदर आकृती, चमेली, तगर व
दार यांच्या दांतवणाने दुःस्वप्ननाश होतो.

अशाप्रकारे 'भावप्रकाश' या ग्रंथामध्ये विविध वनस्पतींच्या दंतधावनाकरिता केलेल्या वापराचे विविध फायदे सांगितलेले आहेत. परंतु या विधानाला वैज्ञानिक संशोधनाचा पाठींबा अद्याप मिळालेला नाही.

याच ग्रंथात पुढे लिहितात -

गुर्वाकस्तालहिन्तालौ केतकश्च बृहत्रण: ।
खर्जूरं नारिकेलं च सप्तैते तृणराजका: ।
तृणराजसमुत्पन्नं य: कुर्याद्दन्तधावनम् ।
नरश्चाण्डालयोनि: स्याद्यावद्गङ्गां न पश्यति ।।[१२]

सुपारी, ताल, हिंताल, केतकी, बांबू, खजूर व नारळ या सप्तवृक्षांना 'तृणराज' म्हणतात. या तृणराज संज्ञक वृक्षांच्या काडीने जो दन्तधावन करेल तो नर जोपर्यंत गंगादर्शन करीत नाही तोपर्यंत चांडाल योनितला समजावा.

'भावप्रकाश' ग्रंथातील श्लोकांवरून असे दिसते की दन्तधावनयोग्य वनस्पतींचा गुणगौरव व दन्तधावनास अयोग्य वनस्पतींच्या वापराचा निषेध हा मानवी मनाच्या मानसिक, दैहिक, सामाजिक उच्च स्तर मिळविण्याचा प्रयत्न व तसेच पापाविषयीच्या कल्पना याविषयीच्या जाणीवेने केलेला आहे.

न खादेद्गलताल्वोष्ठजिह्वादन्तगदेषु तत् ।
मुखस्य पाके शोथे च श्वासकासवमीषु च ।।[१३]

(१) दन्तरोग होऊ नये याकरिता करण्याचे उपाय.

(२) दन्तरोग झाल्यावर त्यावरील उपचार

'स्वस्थस्य स्वास्थ्यरक्षणम्' हे आयुर्वेदाचे मूळ तत्त्व आहे. त्यानुसार आयुर्वेदात दिनचर्या व ऋतुचर्या यांचे सविस्तर वर्णन आहे. दंतसंपत म्हणजे सुंदर दात कसे असावे याविषयी आयुर्वेदीय ग्रंथामध्ये सांगतात -

पूर्णता समता घनता शुक्लता स्निग्धता श्लक्ष्णता

निर्मलता निरामयता किञ्चिदुन्नताग्रता

दन्तबन्धनानां च समता रक्तता स्निग्धता

बृहद्घनस्थिरमूलता चेति दन्तसम्पदुच्यते। (काश्यपसंहिता [illegible])

दातांची पूर्णता, समता, घनता, शुभ्रता, स्निग्धता, गुळगुळीत पृष्ठभाग, निर्मलता, निरोगता, किंचित उभार असलेले दात व दंतबंधन म्हणजे हिरड्या त्यांची समानता, गुलाबीपणा, स्निग्धता, दृढता व स्थिरमूलता हे सर्व दन्तसंपत म्हणजे निरोगी दातांचे गुण समजले जातात.

निरोगी दातांकरिता सविस्तररीतीने स्पष्ट केलेले दंतधावन व जिह्वानिर्लेखन या क्रिया दिनचर्येत व्यवस्थित रीतीने समाविष्ट केलेल्या असाव्यात. दंतरोगांवरील आयुर्वेदिक उपचार, कवल, गण्डूष व चूर्ण या प्रकारचे आहे. याव्यतिरिक्त रोगांवरील औषधी उपाय (वाग्भट) व शस्त्रक्रियात्मक उपाय (सुश्रुत) अनेक प्रकारचे आहेत.

चरकाचार्यांनी निरोगी मनुष्याचे आरोग्यरक्षण, आजारी मनुष्याची व्याधिमुक्तता हे आयुर्वेदाचे ध्येय सांगितले आहे.

स्वस्थानाम् स्वास्थ्यरक्षणम्।

व्याधितानाम् व्याधिपरिमोक्षणम् च॥

चरकाचार्यांनी उपदेश केलेला आहे -

विनापि भैषजे व्याधिः पथ्यादेव निवर्तते।

न तु पथ्यविहीनस्य भेषजानां शतैरपि॥

पुष्कळशा व्याधी केवळ पथ्याने निवारणीय आहेत. पण पथ्याविना शेकडो वैद्य आणले तरी त्याचा उपयोग होणे कठीण.

हिताशीस्यात् मिताशीस्यात् कालभोजी जितेन्द्रियः ।
पश्यन् रोगान् बहुन् कष्टान् बुद्धिमान विषमाशनात् ।।

शरीराच्या हिताचे असेल ते खावे. मित म्हणजे मोजके खावे. ठराविक वेळच्यावेळी खावे, आहारात समतोल न राखणाऱ्या व्यक्तीस पुष्कळ रोग व कष्ट होतात, हे बुद्धिमान मनुष्य पाहतो.

शेवटी असे म्हणता येईल -

युक्ताहार विहारस्य युक्तकर्मसु चेष्टसु ।
युक्तस्वप्नाव बोधस्य व्याधि भवति सुसह्यः ।।

आजचे युग हे विज्ञान युग आहे. विज्ञान हे उत्तरोत्तर प्रगती करणारे शास्त्र आहे. आधुनिक काळामध्ये अनेकविध उपकरणांद्वारे व विविध तंत्रांद्वारे दन्तरोगप्रतिबन्धक उपाय केले जाऊ शकतात. परंतु ज्याकाळात या उपलब्धी नव्हत्या, त्या काळात देखील इतक्या सूक्ष्मतेने निरीक्षण करून दन्तरोगप्रतिबन्धक उपाय शास्त्रोक्त पद्धतीने केले जात होते हे सिद्ध होते.

आधुनिक काळामध्ये जरी सर्वप्रकारच्या काष्ठौषधींची उपलब्धी नसली तरी कडुलिंब आदी वृक्षांची मुबलकता आहे. अशारीतीने केलेला दन्तधावनविधी व जिह्वानिर्लेखनाने मुखाची स्वच्छता प्रतिदिनी संपूर्णपणे केली जाते. अन्न व जल हे दोनही मुखाद्वारेच शरीरात प्रविष्ट होतात. त्यामुळे मुखाची पूर्ण स्वच्छता अपेक्षित आहे.

आजच्या धकाधकीच्या दैनंदिन जीवनामध्ये दररोज दातवण करण्याकरिता लागणारा वेळ जनांकडे नसतो ही सध्यस्थिती आहे. परंतु रोज दिवसातून एकवेळ - सकाळी टूथब्रश व टूथपेस्ट यांच्या साहाय्याने मुखाची स्वच्छता केल्यानंतर जर अंगुलीमर्दनाने पूर्ण मुखाची स्वच्छता केली तरी पुरेसे आहे. त्याचप्रमाणे वेळ मिळत असेल त्यानुसार दिवसातून एकवेळा तरी कोणतेही आयुर्वेदिक मंजन जे बाजारात सहजतेने उपलब्ध असते, त्याचा वापर करून दात व हिरड्या यांची स्वच्छता

करता येते. वेळेचा अभाव हे अत्यंत प्रभावी पण तितकेच असत्य कारण न देता दिवसातील २४ तासापैकी किमान २ मिनीटे स्वतःच्या शरीरातील एका अत्यंत महत्त्वपूर्ण अवयवाची स्वच्छता व निगा ठेवण्याकरिता खचितच खर्च करता येतील. अनेक बहुराष्ट्रीय व राष्ट्रीय कंपनी वनौषधींच्या अर्कांपासून बनविलेली दंतधावनाकरिता उपयोगी वस्तू पेस्ट व मंजन या दोनही स्वरूपात बाजारात उपलब्ध करून देतात. आपल्याला रूचेल व झेपेल असा प्रकार प्रथम निवडून व नंतर कायम स्वरूपात वापरून निरोगी मुखसंपदा प्राप्त करता येईल.

## दन्तधावनक्रियेकरिता निर्देशिलेल्या, वनौषधींची मराठी ओळख

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| मधूक | – | मोह | दाडिम | – | डाळिंब |
| करञ्ज | – | करंज | ककुभ | – | केशर |
| निम्ब | – | कडुलिंब | कूटज | – | कुडा |
| खदिर | – | खैर | जाती | – | जाई |
| अर्क | – | रूई | तगर | – | तगर |
| वट | – | वड | मालती | – | चमेली |
| प्लक्ष | – | पिंपरी | मन्दार | – | तांबडी रुई |
| वैदर्य | – | विदारीकन्द | ताल | – | ताड |
| बिल्व | – | बेल | केतक | – | केवडा |
| उदुम्बर | – | औदुम्बर | बृहत्तण | – | बांबू |
| आम्र | – | आंबा | खर्जूर | – | खजूर |
| कदम्ब | – | कदंब | नारिकेल | – | नारळ |
| चम्पक | – | सोनचाफा | कुष्ठ | – | पुष्करबीज |
| शिरीष | – | शिरीष | पाठा | – | पहाडवेल |
| अपामार्ग | – | आघाडा | मुस्त | – | नागरमोथा |

| | | |
|---|---|---|
| लोध्र | – | लोध्र |
| करवीर | – | कण्हेर |
| कटुक | – | कुटकी |
| पूग | – | सुपारी |
| लवङ्ग | – | लवंग |
| कक्कोल | – | कंकोळ |
| कर्पूर | – | कापूर |
| हिंताल | – | हिंताल |
| गुर्वाक | – | सुपारी |
| आसण | – | असाणा |
| सर्ज | – | राळ |
| अरिमेद | – | शेण्याखैर |

(रानडे, देशपांडे लिखित 'द्रव्यगुणविज्ञान' या पुस्तकातून साभार)

*****

# संदर्भ सूची


१. भे.सं. अष्टोध्याय/१०-१३

२. आ.स्व.

३. आ.स्व.

४. सु.सं.२४/३

५. तदैव २४/४

६. च.सं. ५/७४-७५

७. तदैव ५/७६

८. सु.सं. २४/१०-१२

९. भा.प्र. ५/२४-२५

१०. भा.प्र. ५/२६

११. भा.प्र. ५/२७-३४

१२. भा.प्र. ५/३५-३६

१३. भा.प्र. ५/३७

१४. भा.प्र. ५/३८-३९

१५. भा.प्र. ५/४०-४१

# संदर्भ सूची


१. भे.सं. अष्टोध्याय/१०-१३

२. आ.स्व.

३. आ.स्व.

४. सु.सं.२४/३

५. तदैव २४/४

६. च.सं. ५/७४-७५

७. तदैव ५/७६

८. सु.सं. २४/१०-१२

९. भा.प्र. ५/२४-२५

१०. भा.प्र. ५/२६

११. भा.प्र. ५/२७-३४

१२. भा.प्र. ५/३५-३६

१३. भा.प्र. ५/३७

१४. भा.प्र. ५/३८-३९

१५. भा.प्र. ५/४०-४१

# प्रकरण - ६
# उपसंहार

दंतव्यवसायविषय व संस्कृतविषय यांच्या समन्वयाने प्रस्तुत लघुशोधप्रबंधाचे कार्य हाती घेण्यात आले आहे.

पुराणमित्येव न साधु सर्वं । न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।।

कालिदास - मालविकाग्निमित्रम् १-२

- जुने ते सर्व सोने व नवे ते सर्व टाकाऊ असे नसते. हाच नियम दोन्ही काळांना उलट अर्थाने देखील लागू होतो. म्हणजेच प्रत्येक नवीन संकल्पना अनुकरणीय नसते व प्रत्येक जुनी संकल्पना उपहासयोग्य नसते. नव्या जुन्या संकल्पनांचा, मतांचा, शोधांचा पूर्वग्रहरहित पद्धतीने अभ्यास करून वर्तमानकाळातील आवश्यकतेनुसार त्यांचा स्वीकार अथवा अस्वीकार करणे योग्य आहे.

- दंतशास्त्राविषयीचे संशोधन असल्यामुळे दंतविषयक इतिहास पाहणे आवश्यक होते. त्याचा थोडक्यात आढावा घेतला आहे. प्राचीन व मध्य काळापेक्षा आधुनिक काळातील दंतचिकित्सा अधिक प्रगल्भ व विकसित झालेली आहे, यात शंकेला वाव नाही. परंतु साधारण २५०० वर्षांपूर्वी देखील आयुर्वेदामध्ये दंतचिकित्सा विस्ताराने नोंदवलेली आहे हे पाहून आश्चर्य व अभिमान वाटणे साहजिक आहे.

- दुधाचे दात पडून नवे दात येते ही नैसर्गिक क्रिया आहे. परंतु त्यांच्या पडण्या-येण्याच्या वेळा ज्या आयुर्वेदीय ग्रंथांमध्ये नोंदवल्या आहेत, त्या आधुनिक काळातील दंतवैद्यांच्या

निरीक्षणाशी तंतोतंत जुळतात. दांत येण्याच्या वेळेस बालकांना व त्यायोगाने त्यांच्या मातांना होणाऱ्या त्रासाचे आजचे बालरोगतज्ञ साक्षी आहेत.

- एकंदर दंतरोग ८ ते १० सांगितले आहेत. या संख्येतील फरक केवळ या कारणाने आहेत की वेगवेगळ्या आयुर्वेदाचार्यांनी काही दंतरोग दंतमूलरोगात समाविष्ट केले आहेत.

- आयुर्वेदानुसार प्रथम चिकित्सा कवल-गण्डूष-चूर्ण अशा प्रकारांनी (Conservative) केली जाते व हे उपाय करून देखील जर रोग्याला दन्तरोगापासून मुक्ती मिळत नसेल तरच दांत काढणे (Surgery) हा उपाय सांगितला आहे. आधुनिक दंतशास्त्र देखील अशाच प्रकारची चिकित्सा उत्तम मानतो.

- मुखाची, दांतांची व जिह्वेची स्वच्छता व त्यांचे एकंदर शरीराच्या आरोग्याच्या दृष्टीने महत्त्व आयुर्वेदाचार्यांना जाणवले होते असे दिसते. कारण पूर्ण वैद्यक शास्त्रात जरी दंतवैद्यकशास्त्राची वेगळी शाखा नसली तरी दन्तरोगचिकित्सेला दिलेले विस्तारीत रूप या चिकित्सेचे त्यांना जाजणवलेले महत्त्व दर्शविते. आधुनिक काळामध्ये दंतवैद्यकशास्त्र अनेक शाखांसह प्रस्थापित झालेले आहे व शरीरातील अनेक प्रकारच्या विकृतींच्या बाबतीत प्रथम पायरीवरील जाणीव दंतवैद्याकडील तपासणीत होते.

- भारत हा कृषीप्रधान देश आहे. बहुतांशी जनतेला अत्याधुनिक दवाखाने उपलब्ध नाहीत. अशा वेळेस सहजप्राप्त वनौषधींच्या सहाय्याने दंतसंपदा जर सुरक्षित ठेवता येत असेल तर तसे प्रयत्न केले पाहिजेत. सामान्य जनतेला दातवण व जिह्वा निर्लेखनाचे महत्त्व समजावून सांगून समाजातील दंतरोगांचे प्रमाण कमी करता येईल.

- भारतात निसर्गसंपत्तीची मुक्त उधळण आहे. परंतु विश्वातील महासत्ता या वनौषधींचे पेटंट घेऊन त्यावर आपला हक्क प्रस्थापित करतात. अशा परिस्थितीत भारतीय आयुर्वेदातील वैद्यांनी अधिक सजग राहिले पाहिजे व समाजातील घटकांनी त्यांचे हात बळकट करण्याची आवश्यकता आहे. अशा जागृतीने प्राचीन ज्ञानाची संपदा राखली जाईल.

- प्रस्तुत शोधनिबंधात केवळ दंतोद्भेद, दंतरोगनिदान व चिकित्सा यावरील आयुर्वेदीय सिद्धांत अभ्यासिले आहेत. स्थालीपाकन्यायाने आयुर्वेदीय ग्रंथातील केवळ काही सिद्धांत प्रकाशात आणण्याचा प्रयत्न केलेला आहे. अष्टांगआयुर्वेदातील दंतवैद्यकीय चिकित्सा हा एक फार लहानसा भाग आहे. शरीरातील इतर संस्था, अवयव, रोग यांच्यावर आयुर्वेदिय संशोधनांचे सिद्धांत व त्यांचा आधुनिक वैद्यकीय उपचार पद्धतीमध्ये समावेश करण्याच्या दृष्टीने केलेला अभ्यास निश्चितपणे समाजोपयोगी ठरेल. भुतकाळातील उपलब्ध ज्ञानाच्या शिदोरीवर भविश्यकाळाच्या दिशेने उचलली जाणारी पावले निश्चतपणे, ठामपणे, न अडखळता वर्तमान काळात मार्गक्रमण करू शकतील.

- आधुनिक शास्त्राचे पुरस्कर्ते संस्कृत भाषा जाणत नाहीत व संस्कृत भाषितांचा आधुनिक शास्त्रांविषयी सूक्ष्मतेने अभ्यास नसतो. त्यामुळे त्यांच्या मते विचारांचे आदान प्रदान होत नाही. आपल्या पूर्वजांचा अत्यंत मोलाचा असा ठेवा याच त्रुटींमुळे आपल्या नजरेसमोर असूनही आपल्याला दिसत नाही ही खेदाची गोष्ट आहे. स्वव्यवसायनिष्ठा व संस्कृतनिष्ठा या दोहोंच्या समन्वयाची आज आपल्याला अत्यंत आवश्यकता आहे. या लघुशोधनिबंधाद्वारे आधुनिक व प्राचीन शास्त्र यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केला आहे. अधिक प्रमाणात जर आधुनिक शास्त्राचे पुरस्कर्ते संस्कृत अभ्यासकांशी एकजूट करून आपला अमूल्य ज्ञानठेवा उपयोगात आणतील तर निश्चितच भारत हा विश्वातील इतर देशांचे नेतृत्त्व करू शकेल.

*****

# परिशिष्ट ७
# मुखविवर व दन्तरचना




मानवी दंतपंक्ती
अस्थायी व स्थायी



The mouth is the entrance to the digestive system. Here, food is chewed and moistened.

मुखविवर




दंत रचना

# परिशिष्ट २
# आयुर्वेद परंपरा व संप्रदायक्रम



# संदर्भग्रंथसूची


१. आयुर्वेदाचा इतिहास, वैद्य पी. जी. धानोरकर, प्रकाशिका इंदु धानोरकर, गजानन प्रिंटींग प्रेस, १९९७, प्रथमावृत्ती

२. आयुर्वेदीय स्वस्थ वृत्त, वैद्य नारायणशास्त्री जळूकर, महाराष्ट्र विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, नागपूर, १९८१, दुसरी आवृत्ती

३. काश्यप संहिता (वृद्धजीवकीयं तन्त्रं वा), नेपालराजगुरुणा पं. हेमराजशर्मणा, आयुर्वेदालंका श्री सत्यपालभिषगाचार्य, चौखम्बा संस्कृत संस्था, वि.स. २०६२, दशम संस्करण

४. चरक संहिता, व्याख्याकार काशिनाथ शास्त्री, चौखम्बा संस्कृत संस्थान, वि. सं. २०५४, पंचम संस्करण

५. प्रत्यक्ष शारीरम्, प्रा. सौ. संयुक्त गोखले, नागपूर प्रकाशन, २०००, प्रथमावृत्ती

६. भावप्रकाश, व्याख्याकार भिषग्रत्न, श्री. ब्रह्मशङ्कर मिश्र, चौखम्बा संस्कृत संस्थान, वि.सं. २०६१, एकादश संस्करण

७. भेलसंहिता, संपादक वेंकट सुब्रह्मण्यशास्त्री, सरस्वती महल ग्रंथालय, तंजावर, १९७७

८. भैष्यज्य रत्नावली, विद्योतिनी टीकासहित, चौखम्बा संस्कृत संस्थान, १९६५

९. माधव निदानम्, महामहोपाध्याय श्रीविजयरक्षितः श्रीकण्ठदत्ताभ्यां विरचितया, चौखम्बा संस्कृत संस्थान, वि. सं. २०११, द्वितीय आवृत्ती

१०. शारङ्गधर संहिता, पं. दुर्गादत्त शास्त्री, प्रकाशक श्री. बाबू बैजनाथ प्रसाद, विश्वेश्वर प्रेस, काशी, १९४९

११. सार्थ वाग्भट, डॉ. गणेश कृष्ण गर्दे, अनमोल प्रकाशन, पुणे, २००६

१२. सुश्रुत संहिता, व्याख्याकार कविराज डॉ. अंबिकादत्त शास्त्री, चौखम्बा संस्कृत संस्थान, वि. सं. २०४६, सप्तम संस्करण

